# जीवन-प्रभा



**दत्तात्रय दामोदर पेण्डसे**

यांच्या निवडक कवितांचा

सङ्ग्रह



प्रस्तावना

**श्री. वि. स. खाण्डेकर**



जानेवारी १९३९

**किम्मत १ रुपाया.**

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७ | १८ | शिम्पीतऽ | शिम्पितऽ |
| २८ | १ | चन्दम | चन्द्रम |
| ३१ | खालून २ | आन्दाची | आनन्दाची |
| ३३ | ,, २ | उलटी | उलटीच |
| ४० | १ | निमळ | निर्मळ |
| ४७ | ११ | किती सुचनां | किति सुजनां |
| ,, | १३ | वरतसे ! | वरसते ! |
| ५२ | १४ | स्वान्तत्र्य | स्वातन्त्र्य |
| ५३ | ५ | गजुनी | गर्जुनी |
| ५८ | ४ | स्फूर्तीनें | स्फूर्तिनें |
| ५९ | ७ | नाविन्याची | नाविन्यची |
| ,, | १२ | भरून | भरुन |
| ६३ | १ | उगमतां | उमगतां |
| ,, | १२ | कुठेतरी | कुठतरी |
| ,, | १७ | आदिवृत्तीचें | आदिवृत्तिचें |
| ७६ | ५ | लाडिक | लाडीक |
| ,, | शेवटची | सम्मोहवी | सम्मोहवो |
| ८१ | खालून ४ | घांघ | घांस |
| ८९ | ६ | मातित | मानित |
| ९१ | खालून २ | मृदुशील | मृदु शीळ |
| ९२ | १ | किती | किति |

# तोण्ड-ओळख

ंचा 'राजहंस,' रेन्दाळकरांचें 'उघडि नयन रम्य
ली' या मधुर चरणानें प्रारम्भ होणारें 'प्रबोधन,'
णी,' यशवन्तांची 'आई,' माधव ज्यूलियन् यांची
कविता जशा एकेकाळीं गाजून गेल्या, तशी सध्यां
त नाहीं, किम्बहुना वाचकांना आकृष्टहि करीत नाहीं, ही
. कुसुमाग्रज, बोरकर, ठोकळ प्रभृति तरुण कवींची
तः सरस असते हें कुणीही कबूल करील. पण वर
ं एकेकाळीं जी लोकप्रियता सम्पादन केली, ती मात्र
ाही वांट्याला येण्याचा सम्भव दिसत नाहीं.
लागली, कवींची प्रतिभा रोडावली, वगैरे अनेक
तींत नामाङ्कित साहित्यिक केव्हांच करून चुकले
ळ अंशीं चुकले आहेत असेंच अजूनही मला वाटतें.
ी आहे, तिचा बाजारभाव कमी झाला आहे, हें
रन्तु या परिस्थितीचें खापर केवळ कवींच्या डोक्यावर
सोडून संन्याशांना सुळीं देण्यासारखें आहे.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७ | १८ | शिम्पीतऽ | शिम्पितऽ |
| २८ | १ | चन्दम | चन्द्रम |
| ३१ | खालून २ | आन्दाची | आनन्दाची |
| ३३ | ,, २ | उलटी | उलटीच |
| ४० | १ | निमळ | निर्मळ |
| ४७ | ११ | किती सुचनां | किति सुजनां |
| ,, | १३ | वरतसे ! | वरसते ! |
| ५२ | १४ | स्वान्तत्र्य | स्वातन्त्र्य |
| ५३ | ५ | गजुनी | गर्जुनी |
| ५८ | ४ | स्फूर्तीनें | स्फूर्तिनें |
| ५९ | ७ | नाविन्याची | नाविन्यची |
| ,, | १२ | भरून | भरुन |
| ६३ | १ | उगमतां | उमगतां |
| ,, | १२ | कुठेतरी | कुठतरी |
| ,, | १७ | आदिवृत्तीचें | आदिवृत्तिचें |
| ७६ | ५ | लाडिक | लाडीक |
| ,, | शेवटची | सम्मोहवी | सम्मोहवो |
| ८१ | खालून ४ | घांघ | घांस |
| ८९ | ६ | मातित | मानित |
| ९१ | खालून २ | मृदुशील | मृदु शीळ |
| ९२ | १ | किती | किति |

# तोण्ड-ओळख

गोविन्दाग्रजांचा ‘ राजहंस, ’ रेन्दाळकरांचें ‘ उघडि नयन रम्य उषा हंसत हंसत आली ’ या मधुर चरणानें प्रारम्भ होणारें ‘ प्रबोधन, ’ बालकवींची ‘ फुलराणी, ’ यशवन्तांची ‘ आई, ’ माधव ज्यूलियन् यांची ‘ कञ्चनी ’ इत्यादि कविता जशा एकेकाळीं गाजून गेल्या, तशी सध्यां एकही कविता गाजत नाहीं, किम्बहुना वाचकांना आकृष्टहि करीत नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. कुसुमाग्रज, बोरकर, ठोकळ प्रभृति तरुण कवींची काव्यरचना सामान्यतः सरस असते हें कुणीही कबूल करील. पण वर उल्लेखिलेल्या कवींनीं एकेकाळीं जी लोकप्रियता सम्पादन केली, ती मात्र यांच्यापैकीं एकाच्याही वांट्याला येण्याचा सम्भव दिसत नाहीं. कवितेला ओहोटी लागली, कवींची प्रतिभा रोडावली, वगैरे अनेक निदानें या बाबतींत नामाङ्कित साहित्यिक केव्हांच करून चुकले आहेत. पण ते पुष्कळ अंशीं चुकले आहेत असेंच अजूनही मला वाटतें. कविता मागें पडली आहे, तिचा बाजारभाव कमी झाला आहे, हें मी मान्य करतों. परन्तु या परिस्थितीचें खापर केवळ कवींच्या डोक्यावर फोडणें म्हणजे चोर सोडून संन्याशांना सुळीं देण्यासारखें आहे.

काव्याला अगदीं जवळ असलेल्या नाट्यक्षेत्रांतही हेंच करुणाजनक दृश्य आजच्या घटकेला दिसत आहे. अत्र्यांच्यासारख्या प्रतिभाशाली लेखकालाही प्रहसनाच्या सीमेवर उभें राहून नाट्यरचना केल्याशिवाय रङ्गभूमी जिवन्त राहूं शकत नाहीं असाच अनुभव आलेला दिसतो! अत्र्यांचीं नाटकें सोडून दिलीं तर गेल्या पांच वर्षांत 'आन्धळ्याची शाळा,' 'छापील संसार,' अशा एका हाताच्या बोटांवर मोजतां येतील इतक्या-सुद्धां सरस नाट्यकृती निर्माण झाल्या नाहींत. दृश्य वाङ्मयांत बोलपटांनीं जसें नाटकांना सळो का पळो करून सोडलें तसें श्राव्य वाङ्मयांत लघु-कथेनें कवितेला निस्तेज करून टाकलें अशी वस्तुस्थिति आहे. काव्यगायनाच्या प्रथेमुळें कवितेची लोकप्रियता कायम रहायला हरकत नव्हती असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण काव्यगायनाला आलेल्या लोण्ढ्याचा सदुपयोगा-इतकाच दुरुपयोगहि झाला. गोड गळा पण बेताची बुद्धि असलेल्या पद्यकारांनीं या प्रथेचा आपला लौकिक वाढवून घेण्याकडे भरपूर उपयोग करून घेतला. गायकाच्या गोड गळ्याला भुलून श्रोत्यांनीं ट ला ट जुळवून तयार केलेलीं पद्यें आनन्दानें ऐकलीं. पण त्यामुळेंच कल्पना आणि भावना यांनीं फुललेल्या गीतांचा व श्रोत्यांचा परिचय हळुहळु कमी होत चालला. केशवसुतांपासून ताम्ब्यांपर्यन्त अनेक प्रतिभासम्पन्न कवींचीं अत्यन्त रमणीय काव्यें अस्तित्वांत असूनही तीं श्रोत्यांच्या काना-पर्यन्त सहसा पोंचलींच नाहींत. बहुजनसमाज कवितांचीं पुस्तकें आपणहून वाचण्याइतका रसिक थोडाच असतो! दांतांनीं गोड ऊस सोलून खाण्यापेक्षां पांचट रस मिळाला तरी तोच पिण्याकडे त्यानेंही आपला कल दाखविला.

मासिकांच्या सम्पादकांनींही कवितेची दुर्दशा व्हायला यथाशक्ति हातभार लावला आहे. मनोरञ्जन, नवयुग, रत्नाकर इत्यादि मासिकांतून कविता अत्यन्त आकर्षक रीतीनें छापल्या जात असत. त्यामुळें सामान्य वाचकांचें सुद्धां त्यांच्याकडे लक्ष जात असे. पण सध्यांचीं प्रमुख मासिकें

आणि महात्मा गान्धी व स्वदेशी व्रत यांच्याविषयीं आदर बाळगूनही शास्त्रीय दृष्टि असेंच म्हणेल कीं खादीचें तत्त्वज्ञान स्वप्नाळु आहे. त्या काळांत हरिजनांचा प्रश्न सोडवण्याकरितां त्यांना सङ्क्रान्ती दिवशीं तिळगूळ आणि दसऱ्या दिवशीं सोनें ( हें अर्थातच तिळगुळापेक्षांही स्वस्त असतें ) देण्याचा प्रघात अनेक ठिकाणीं रूढ झाला ! पण सहभोजनाची चळवळ कांहीं सर्रास सुरू होऊं शकली नाहीं.

केशवसुत, टिळक यांच्यापासूनची आधुनिक कविता अशाच स्वप्नाळु वातावरणांत वाढली होती. दर पिढीला, किम्बहुना दर दशकाला या वातावरणांत बदल होत होता. पण तो बदल म्हणजे स्थित्यन्तर नव्हतें. एका स्वप्नाची जागा दुसरें स्वप्न घेत होतें. जागृतीची तीव्र जाणीव कुठेंच नव्हती. सृष्टि, प्रीति, देशभक्ति, सुधारणा, क्रान्ति इत्यादि कवींच्या आवडत्या विषयांवरील या दीर्घ कालांतील कविता तुलनात्मक दृष्टीनें पहाव्यात. त्यांच्या अन्तःप्रवाहांत बरेंचसें साम्य आहे असें आढळून येईल.

१९३० च्या कायदेभङ्गाच्या चळवळीनें आमच्या स्वप्नाळु जीवनाला अत्यन्त जोराचा धक्का दिला. ही चळवळ राजकीय स्वरूपाची होती खरी ! पण या धरणीकम्पानें पिढ्या न् पिढ्या डौलानें मिरवत आलेलीं समाजाच्या सर्व क्षेत्रांतील स्वप्नमन्दिरें भग्न केलीं. सङ्क्रमणाचा काळ सुरू झाला. १९३० सालीं उघड उघड सुरू झालेलें हें वादळ अजून शान्त झालें नाहीं, इतक्यांत शान्त होणारही नाहीं.

हा सङ्क्रमणाचा काळ निव्वळ भावनेचा नाहीं, तर्कशुद्ध विचाराचा आहे; अंधःश्रद्धेचा नाहीं, बुद्धिवादाचा आहे; व्यक्तिमाहात्म्याचा नाहीं, तत्त्वमाहात्म्याचा आहे ! वाडवडिलांच्या कुव्यांतील खारें पाणी पीत बसण्याची मनोवृत्ति आतां राहिलेली नाहीं. माळरानें तुडवून, तिथें विहिरी खणून, त्यांतील गोड पाणी पिऊं अशी इच्छा आतां तरुणांच्या मनोभूमींत अङ्कुरित झाली आहे. आपल्या भावभावनांचें स्वरूपही त्यामुळेंच बदलत चाललें आहे. 'रोमिओ ॲण्ड ज्युलिएट' वाचतांना नायक

आणि नायिका यांच्या परस्परावरील प्रेमाचें आपण कौतुक करितों, आपलें प्रेम सफल होत नाहीं म्हणून प्राण अर्पण करणाऱ्या त्या प्रेमिकांच्या त्यागाची आपण मनांतल्या मनांत क्षणभर पूजाही करितों. पण आजकालच्या सामाजिक कथेंतील नायक–नायिका असें वागूं लागलीं तर आपणांला त्यांच्याविषयीं तेवढें कौतुक वाटेल का? प्रेमभङ्ग झालेल्या जयन्ताला गडकऱ्यांनीं १९११ त प्रेमसंन्यास घ्यायला लावला! पण १९१७ त 'एकच प्याल्यां'त त्यांनीं भगीरथाच्या रूपानें जयन्ताचा जो नवा अवतार निर्माण केला त्याला रामलालच्या तोंडून देशसेवेचा उपदेश करण्याची स्फूर्ति त्यांना झालीच कीं नाहीं? वैयक्तिक जीवनाच्या मागें असलेली ही सामाजिक पार्श्वभूमि दिवसेंदिवस अधिकाधिक उज्ज्वल होत जाणार यांत शङ्का नाहीं.

सङ्क्रमण–कालांत विचारप्रवणता वाढते, परिचित–भाव–भावनांविषयीं एक प्रकारची उदासीनता वाटूं लागते आणि त्याचमुळें कवींचें कार्य अधिक अवघड होऊन बसतें. ताम्ब्यांच्यासारखी प्रतिभा असल्यावांचून किंवा भविष्यकालाचीं उज्ज्वल स्वप्नें पाहून तीं रङ्गवण्याचें कलमांत कौशल्य सम्पादन केल्यावांचून अशा वेळीं कवितेला लोकप्रियता मिळणें किम्बहुना लोकांपुढें येणें कठीण असतें.

आणि म्हणूनच 'जीवन प्रभे'चे जनक श्री. पेण्डसे यांचें या सङ्ग्रहाबद्दल मी कौतुक करितों. त्यांचे लघुनिबन्ध यापूर्वींच वाचकांपुढें आले आहेत. त्याच क्षेत्रांत अधिक यश सम्पादन करण्याची आकाङ्क्षा त्यांनीं बाळगिली असती तर त्यांत वावगें असें कांहींच नव्हतें. पण फक्त कवितेवरल्या भक्तीमुळेंच त्यांनीं तिची आराधना केली आहे. आपल्या अनेक वर्षांच्या पूजनांतलीं निवडक पुष्पें आज ते वाचकांना सादर करीत आहेत. पाकळ्यांवरून फुलांची कल्पना करून देण्यांत फुलांना अन्याय होतो खरा! तथापि पुष्पांचा डौलदारपणा पाकळ्यांवरूनही दिसून येतोच कीं नाहीं!

(१) तुज उत्सुक मी पहावया
परि मार्गांवर भेटतां तुला

सहजीं मुख खालतीं वळे
करही सावरतात अञ्चला ! (पृ. ३३)

(२) सत्त्वें रुजतात,जों फिरविते सत्ता वरी नाङ्गर !(पृ.४८)

(३) सावरी घोळ धांवरा भरभरा करीं
भुरुभुरु तोंच केसांच्या पलटणी कपाळावरी
जलबिन्दु डंवरले मुखीं गोल मौक्तिकें
मुख होई गोरेंमोरें–गाल कीं लाल माणकें (पृ. ६९)

(४) किनारीं कल्पवृक्ष नारळी
दाटूनी देत हिला सावली
विञ्झणे हालती तगमग तरि चालली. (पृ. ३८)

(५) पदर उडे वरती
कुन्तल भुरभुरती
बन्धन अवगणती
दृष्टि गलोल् भिरभिरुनी विन्धी मर्मा खोल् ! (पृ. २०)

अनुकृति हा बाल्याचा, अनुरक्ति हा तारुण्याचा आणि अनुभूति हा प्रौढत्वाचा आत्मा आहे. मनुष्याप्रमाणें कवीच्या मनालाही या तीन अवस्थांतून जावें लागतें. श्री. पेण्डसे यांच्या अनेक कवितांचे विषय, चाली व अन्तरङ्ग ह्या गोष्टी अनुकृतीच्या द्योतक आहेत. अनुभूतीचा रसरशीतपणा अजून त्यांच्या कवितेंत फारसा आढळत नाहीं व तें स्वाभाविकच आहे. अकालीं आलेल्या प्रौढत्वांत विकासापेक्षां विकृतीचाच भाग अधिक असण्याचा सम्भव असतो; नाहीं कां ? श्री. पेण्डसे यांचें कविमन आज अनुकृति आणि अनुरक्ति यांच्या सीमारेषेवर उभें असल्याचें प्रत्यन्तर प्रस्तुत सङ्ग्रहांत पदोपदीं येतें. 'जीवनप्रभे'चा प्रारम्भ 'शारदेस' या गीतानें झाला असून त्याचें वृत्तसुद्धां इतर प्रसिद्ध कवींनीं शारदेला उद्देशून लिहिलेल्या गीतांचेंच आहे. या कवितेच्या शेवटीं कल्पनेला कलाटणी देण्याकरितां

शान्तींतलें रूप हें योग्य देवी !
जैं जीवनाच्या कलानें कला.
आतां परी सङ्गराच्या तुताऱ्या
दाबी कला जीवनाचा गळा ! ( पृ. १८ )

असे उद्गार कवीनीं काढले आहेत. पण सबंध कवितेची रचना या कलाटणीला फारशी पोषक नाहीं. ‘ तुफान ’, ‘ आवाहन ’, ‘ विज्ञापना ’, ‘ मृत्यूस ’, ‘ पावसाचे थेम्ब ’, ‘ भाईस ’ इत्यादि कवितांवर अनुकृतीची छाया पडली असल्यामुळें त्या थोड्या फार निर्जीव वाटतात, असल्या अनुकृतीपेक्षां कविमनाची अनुरक्ति दर्शविणाऱ्या इतर कवितांतच श्री. पेण्डसे यांचे गुण अधिक प्रगट झाले आहेत. या अनुरक्तीची मुख्य खूण म्हणजे वैचित्र्याची आवड. जीवनांतले सौन्दर्यांचे कण वेचून आणतांना श्री. पेण्डसे त्याच्या एकाच क्षेत्रांत रमत राहत नाहींत. श्री. पेण्डसे सृष्टीच्या सौन्दर्यांशीं समरस होण्याकरितां जसे आकाशांत भराऱ्या मारतात, तसे जीवनसागराच्या तळाशीं असलेले तत्त्वमौक्तिकांचे शिम्पले मिळविण्याकरितां त्यांत बुडी मारण्याचाही प्रयत्न करतात. साध्याभोळ्या आणि खेडवळ कोंकणी जीवांचीं सुखदुःखें त्यांनीं जशीं कुशलतेनें रेखाटलीं आहेत, तशीं सामाजिक क्रान्तीचीं रेखाचित्रेंही त्यांनीं हौसेनें काढलीं आहेत. प्रणयी जनांच्या मनामध्यें शिरून त्यांचीं हितगुजेंच त्यांनीं ऐकलीं आहेत असें नाहीं; ‘ मं मं ’ करणाऱ्या अगर ‘घोडा घोडा’ खेळणाऱ्या बालकांच्या सृष्टींतही त्यांनीं प्रवेश केला आहे. उदाहरणार्थ ‘पापा’ व ‘आवडतें माणूस’ या कविता पहाव्यात. पहिल्या कवितेंत नवी साडी नेसलेली एक चिमुरडी मुलगी तरुणीची ऐट आणून मिरवीत आहे. कुणीतरी पापा घेतांच या बोबडे बोलणाऱ्या तरुणीला राग येतो आणि ती म्हणते—

तों म्हणे ‘ जाहलें मोठी, कां
पापा घेतां तली ! ’ ( पृ.६१ )

पापा घेणाराला आपली चूक कळून येते. विनयभङ्ग वगैरे भानगडी त्याच्या कानावरून गेलेल्या असतातच. तेव्हां तोही दूर होतो !

‘ खरंच कीं ’ म्हणत झडकरी दूर सारली
बिलगुनी, म्हणे तों ‘पापा घ्या, लहान मी आपली !’ (पृ.६९)

या कवितेंत वात्सल्य व विनोद यांचा मोठा मौजेचा सङ्गम आढळतो !

बोबडें बोलणाऱ्या बाळाला आई फार पापे घेते व लाड करते म्हणून ती आवडत नाहीं ! बाबा तर ‘ श्लीग ’ काढायला लावणारे ! वहिनी एरवीं चांगली; पण ती बाळाच्या वांट्यालाच येत नाहीं ! दादा खाऊ देतो खरा; पण माळा, आकडे वगैरे त्याच्या हातांतील वस्तु वहिनींच्याकडेच जातात. बाहुली तिला फार आवडते. पण कांहीं केल्या ती बिचारी बोलतच नाहीं ! शेवटीं हें विचित्र स्वयंवर मोठ्या गंमतीनें सम्पतें. आपलें आवडतें माणूस म्हणून बाळ कुणाची निवड करतें ? आजीची !

‘ पोंक आलें, हले मान
आजी साङ्गे मौजा छान
कोणी लागावतां तिच्या कुशींत दडे ! ’ (पृ. ७१)

श्री. पेण्डसे यांनीं अशा प्रकारचीं शिशुगीतें विपुल लिहावींत अशीच कुणीही रसिक वाचक इच्छा करील. बाह्यतः शिशुगीत वाटणारी पण बळी तो कान पिळी या तत्त्वाचें निदर्शन करणारी ‘ काऊ चिऊ ’ ही त्यांची कविताही वाचनीय आहे.

श्री. पेण्डसे यांचा विशिष्ट आत्मीय गुण कल्पकता हा आहे. ‘काऊ चिऊ’ या कवितेप्रमाणें इतर कित्येक स्थळींहि तो रम्यपणानें प्रगट झाला आहे.

(१) कचांची भुर्भुरे सेना, ध्वजा स्वातंत्र्य वृत्तीची
समीरें सागरीं जैशी भरारी उन्च वीचींची ! (पृ.७६)

(२) जावो हृदय फाडूनी,
सरोवरातें वन्चूनी
सागरातें कल्लोलिनी !

परी होतां रूपान्तर
भेटताती मेघावर
निर्झरिणी सरोवर ! (पृ. ७९)

(३) आमोद कोन्दाटला कोन कोनीं,
सुगन्धी सुमें मोद निःश्वासती !
प्राजक्त शालूवरी भर्जरीच्या
फुलांची खडी काढणें सम्पवी. (पृ. ९६)

'लग्नचाकर,' 'शुभमङ्गल,' 'माझी दिवाळी' इत्यादि कविता कवीच्या कल्पकतेमुळेंच वाचनीय झाल्या आहेत. श्री. पेण्डसे यांना रूपकांची जी विलक्षण हौस आहे तिचा उगम आपण शोधूं लागलों तर तो कल्पकतेंतच आहे असें आढळून येईल.

मात्र त्यांच्या या गुणाचा निर्दोष विकास होणें त्यांच्या भावी प्रगतीच्या दृष्टीनें आवश्यक आहे. शिळे कविसङ्केत व ताज्या कल्पना यांची त्यांच्या कवितांतली गल्लत पाहून निर्माल्य आणि कळ्या एकत्रित केल्यासारखें वाटतें. निरनिराळ्या वेळीं सुचलेल्या उपमा–उत्प्रेक्षा चमत्कृतिजनक असल्या तरी त्या एका सूत्रांत गुम्फून कांहीं एखादी सरस कविता निर्माण करतां येत नाहीं. ' पावसाचे थेम्ब ' ही कविता या दृष्टीनें अवश्य पहावी. वर्णनात्मक कवितेचासुद्धां जो रसात्मक परिणाम वाचकावर व्हावा लागतो तो या कवितेंत मुळीच आढळत नाहीं. पहिल्यान्दा पावसाचे थेम्ब काळ्या मेघांना भिऊन पृथ्वीवर आले आहेत असें कवि साङ्गतात. लगेच या थेम्बांत त्यांना मोतीं दिसूं लागतात. पुढच्याच क्षणीं त्या मोत्यांचें अश्रूंत रूपान्तर होतें. एवढ्यावरही हा जादूचा खेळ थाम्बत नाहीं. कवीला एक नवीनच कल्पना सुचते व तो उद्गारतो—

अविरत झरती या अम्बरांतून धारा,
वन उपवन सिञ्ची मेघरूपी हजारा ! ' (पृ. ६१)

इतका वेळ आपण केवळ कल्पनाविलासांतच गुंग होतों याची आठवण होऊनच कीं काय कवि शेवटी एकदम बोधाचा आश्रय करतो,

" खिदळत फिरण्याला चालले सर्व बिन्दु
जलकणच जुटीनें निर्मिती थोर सिन्धु " (पृ. ६१)

कवितेंत विशिष्ट रसपरिपोषक कल्पनांचाच समावेश करण्याची संवय श्री. पेण्डसे यांच्या रचनेला लागल्यास त्यांच्या कल्पनाशक्तीचें सध्यांपेक्षांहि रसिकांना अधिक आकर्षण वाटेल.

रसापकर्षक शब्दप्रयोग, शिथिल अथवा रुक्ष रचना असलीं वैगुण्येंहि या सङ्ग्रहांत डोकावतात. आपल्या पुढील रचनेंत श्री. पेण्डसे या बाबतींत अधिक दक्षता घेतीलच. 'ग्रह उडु लोणी' 'गान कशा, त्रास घशा' 'लढ, मर शूरापरी', 'संयमें म्हणे 'सबूर', ती इळूच सन्मुखीं !' 'ढग-रेड्यावर यमाचें ठाणें', 'नशिबीं आलेला विष-प्याला सॉक्रेटिससा पी इंसत !', 'निसर्गहृदय-खुमारी' इत्यादि मण्डळी कवीची नजर चुकवूनच कवितांत घुसलीं असावींत !

श्री. पेण्डसे यांच्या कविता-सङ्ग्रहाला प्रस्तावना लिहिण्याचें मी कबूल केलें तेव्हां सङ्ग्रहाच्या अन्तरङ्गापेक्षां एक निराळीच गोष्ट माझ्या दृष्टीपुढें होती. ती म्हणजे ऋणमुक्त होणें. दहा वर्षांपूर्वी माझें पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें तेव्हां प्रस्तावनेकरितां जङ्गिन्याचे निर्भीड व मार्मिक टीकाकार कै. बा. अ. भिडे यांच्याकडे मी धांव घेतली. जङ्गिन्याचें हें ऋण परत करण्याचा योग श्री. पेण्डसे यांनीं मला आणून दिला. या योगायोगामुळेंच 'जीवनप्रभे'च्या अन्तरङ्गाशीं माझा परिचय झाला आणि रसिकांकडून योग्य प्रोत्साहन मिळाल्यास आज अनेकांना निष्पर्ण वाटणारी महाराष्ट्र-काव्यलता पुन्हां पल्लवित होईल या कल्पनेला पोषक असाच अनुभव मला आला. श्री. पेण्डसे परिश्रमपूर्वक आपल्या काव्यगुणांचा विकास करतील तर शिशुगीतें, ग्रामगीतें इत्यादि काव्याचे विभाग ते सुन्दर रीतीनें सजवितील. रसिकांना ते आज सादर करीत आहेत ती 'जीवनप्रभा प्रातःकाळची आहे. तिचा उज्ज्वल प्रकाश योग्य काळीं दिसेल अशी आशा केली तर ती खचित अनाठायीं होणार नाहीं.

कोल्हापूर,
ता. ९-१-३९ }

वि. स. खाण्डेकर.

# जीवन-प्रभा



: १ :

## शारदेस-

तारांस कुर्वाळितां शारदे ! तूं
झङ्कार वायूवरी फांकला.
वाचा मुक्या पर्वताला फुटूनी
घे उद्गमा त्यांत कल्लोलिनी.
ओघामधीं शोभतीं हंसपद्में
काव्येंच कीं तीं मनोहारिणी.
निर्जीव सृष्टीस चैतन्यदात्री
वाग्देवते! धन्य तूझी कला !

## जीवन-प्रभा

बोलावया पाहती वृक्ष वेली
नैसर्गिकी लोपली मुग्धता
उल्हासुनी सृष्टि सारी भरारे
हांसून पानें फुलें नाचतीं
आनन्दमूर्तीतुनी दिव्य गीतें
अव्यक्त नादांत झङ्कारती !
कोलाहलें तापलेल्या जिवाला
दे सावली, शान्तवी अंशतां

केकांतुनी जीवना आळवी त्या
केलें मयूराप्रती वाहन.
अस्तित्व ना दूर रत्नाकराचें
केळी तशा नारळी भोवतीं.
काळी शिळा कोंकणाची निशाणी
सिंहासना जी तुझ्याखालती.
मानार्थ पाषाण होतात तारे
स्वर्गीय सोडून ताराङ्गण !

शान्तींतलें रूप हें योग्य देवी
जैं जीवनाच्या कलानें कला.
आतां परी सङ्गराच्या तुतान्या
दाबी कला जीवनाचा गळा !

———

: २ :

# जीवनप्रभा

कृष्ण शारद निशीं रुद्र ये दशदिशीं
        तारकांच्या गळां रुण्डमाळा !
लवलवत भोवतीं सर्प—उल्का किती
        खाजणी जाळ करि भूतचाळा !   ध्रु०

उसळली मासळी खड्गची तळपलें !
जन्तुतेजें जळीं अनल कीं खळबळे !
क्षुधित वडवाग्निची जीभ जणु ळळळळे !
        जीवनावर जणूं प्रलय—घाला !

प्रलय झाला तरी बीज पर्णावरी
शिवशिरीं ताण्डवीं हंसत शशि जान्हवी
( कोर नी त्रिपथगा तीच उजळी नभा ? )
        मृत्युवर अढळपद जीवनाला !

———

## : ३ : हिन्दोळा आन्दोल

हिन्दोळा आन्दोल
सुस्वर घोळ् जणु सरिताकल्लोल् ध्रु०
मूर्ति भरे नयनीं
गीत घुमे श्रवणीं
महती पटत मनीं
लाथेनें दूर जशी लोटिसि तूं भूगोल्
गाल गुलाब फुलें
नयनयुगुल कमलें
भृङ्ग बुबुळ गमले
गुणगुणणें तव सजणे ! मञ्जुल कोकिल—बोल्
भुवई नाचतसे
नाक हले विकसे
लाडिक ओठ हसे
शशिवदनें हृदय बने बघुनी सहज विलोल्
पदर उडे वरती
कुन्तल भुरभुरती
बन्धन अवगणती
दृष्टि गलोल् भिरभिरुनी विन्धी मर्मा खोल् !
चित्र परी अपुरें
विचार कर चतुरे !
—तरुविण वेल नुरे !
मग घे झोल् टाकुन तोल् अनुभव सौख्य अमोल् !

: ४ :

# स्फूर्ति-देवता

वैभवें नसोत थोर, योग्य लाभली सखी
उन्नतीपथीं सुखी ? ध्रु०
व्योम झाकळून येत
धुन्द जैं दिशाहि होत
मार्ग दाखवीत ज्योत
तैं तिचीच सारखी.
जीवनांत युद्ध घोर
श्रान्त होत थोर वीर
देत हात आणि धीर
मोडतां कणा सखी !
ये तुफान सौख्यपूर
वाहवे भरांत दूर
संयमे म्हणे ‘ सबूर ’
ती हळूच सन्मुखीं !
चूक सूचवी जपून
लाघवीपणें हंसून
झाकते कधींच न्यून
दोषगूण ओळखी.
स्फूर्ति दिव्य मूर्तिमन्त
साह्य नित्य जीवनांत
मार्ग आक्रमी सुखांत
स्वर्ग काय आणखी ?

## : ५ : थट्टा, राग आणि अनुराग

तो:— फुलवेडी स्त्री फुलराणी ?
छे ! ती निर्दय फुलदाणी ! ध्रु०
    फुलराणी तर
    फुलाफुलावर
    फिरवुन मृदु कर
चुम्बुन हंसवी उद्यानीं !
    पिळून माना
    खुडितां त्यांना
    दया जरा ना !
भूषवितां त्यांनीं वेणी.

स्तन्य हरपलें
मलुल तान्हुलें
सुमन तळमळे
दरवळतें निश्वासांनीं !
फुलदाणीहुन
हें कटु वर्तन
शुष्क कचांत न
फुलदाणी मधिं जें पाणी ! १

ती:— स्त्रिया अदय जर
पुरुष कठिणतर
निर्दय फत्तर
न्याय करावा परि कोणीं ?
मुली फुलांसम
पितरांपासुन
तोडुन काढुन
कुस्करिल्या किति तरुणांनीं ?
लता उपटली
मुळें दुखवलीं
दूर आणली
युवक किती घेती ध्यानीं ?
बन्ध निराळे
स्थान वेगळें
कळुन कळवळे
हृदय कितींचें प्रेमानीं ?
स्त्रियांस जणुं ना
मान, भावना

तुम्हां अङ्गना
वाटतात बटकीवाणी !
निज दोषांतें
विसरायाचें
डिवचायाचें
दुजास, ही तर मुलतानी ! २
" असाच मी पण
राक्षस निर्घृण ? "
नयनें रोखुन
पुटपुटली कांहीं मानी !
नवल वर्तलें
मेघ निवळले
गुलाब फुलले
हंसवित रुसलेली राणी
' इश्श ' मधुरसें
वदत हंसतसे
विभ्रमीं दिसे
प्रीतीची अस्फुट वाणी
तूं फुलराणी
अन्यार्थांनीं
( सांगूं कां मी ? )
मूल फूल हीं सम दोन्हीं !
अधर भेटले
रूप सानुलें
नयनीं दिसलें
हृदयें गातीं मधु गाणीं ! ३

———

: ६ :

# दोघींची प्रतीक्षा

नवपरिणीता षोडशवर्षा सुन्दर ही मालती;
अन् किसलयिता वसन्तदयिता लतिका मधुमालती !
हरित पातळें देह नटविला हिनें सुमें माळलीं;
शुकवसना ती प्रसन्नवदना पुष्पवती शोभली !
उत्सुकनयनें, अधिऱ्या हृदयें वाट बघे भिरभिरी—
भृङ्ग लतेवर ? कटाक्ष छे ते ! नजर तिची बावरी !
वात सळसळे, हिला वाटलें "स्वारी आली घरीं"
लगबग धावे, भास असूनहि आस फसविते पुरी !
तरू डोलतां "आला" वाटुन लताहृदीं शिरशिरी
पदर सावरी—पानें हलतीं—धुगधुग अन्तर करी !
फसतां आतुर ललना हृदयीं तरङ्ग उठती किती !
सुखदुःखांचे ऊनपावशी खेळ मुखीं चालती.
फटक पाण्ढरा पडे चेहरा तशीं सुमें तीं पहा
अरुणाचें जें राज्य कपोलीं फुलें गुलाबी अहा !
कुहू कुहू ललकारतसे ही भाट जणूं कोयळ
"आले" वाटुन गोड विचारें प्रभा मुखीं सोज्वळ !
'वसन्त' आला हिचा तिचाही, खुदूकन जोडी हंसे !
सृष्टिसुन्दरी बघुन हांसली ! अजुन हंसें तिथ दिसे !

———

## : ७ : ओकती

उन्हाळ्यांत भाजींचे मळे कोंकणांत कांहीं ठिकाणीं करतात. त्यानां पाणी घालण्याकरितां मळ्यांतील विहिरींच्या कांठावर एक खाम्ब उभा करून व त्याच्या वरच्या टोंकाला एक बाम्बू बान्धून पाणी काढण्याची सोय केलेली असते. त्यास 'ओकती' किंवा 'वकती' असें म्हणतात. बाम्बूच्या एका बाजूस वजन असल्यामुळें पाणी वर काढतांना श्रम होत नाहींत.

लइ मजेशीर वकती र ध्रु०
ये लवून वांगी–मळा
अन् मकाबि कणसाळला
झुळझुळे मुळांशीं नीर
दिस हंसायच्या अगुदर

उट्टं हिवांत बेगनसर
हित वक्तावरति हजीर
तरतरी तमाखुन मिळे
हिंव पसार परशामुळें
मग खपायास खम्बीर
उळ सुरेख वाफ्यांतुन
मखमली फुलत बाजुनंऽ
वासाळत कोथिम्बीर
सुर गळ्यांत अपसुक घुमऽ
त्या भरांत हलके स्रम
वकतिची ग्वाड किरकीर
डबऱ्यामदि बासन पडऽ
बुडबुडून थोडंऽ बुडऽ
वर वढायला न उशीर
जळ वततां पन्हळी भरऽ
लगवगीत फुडं त्यें सरऽ
भिरभीर करी जनु तीर
अस्तुरी शिम्पीतऽ मळा
लागला तुला तो लळा
पळ मळाहि खुणवि अधीर
दे हुरूप मागारिण
तिजसङ्गत विसरऽ शिण
मज मळ्यास ती जनु व्हीर !
रिण जरा तरी ना डरू
म्हनु तवांच फडशा करू
धरितरी माय दे धीर !

———

## : ८ : चान्द्रातीं खाडी किनाऱ्यावर-

चन्दम डोईवर परकाशे, पिठासारं चान्दनऽ
समिन्दराला न्हई भ्येटली सोबा बग साजनऽ
मना वाटतऽ न्हइच्यावानी समदा नखरा तुजा
न्हइच्यागत चालशी मुरडुनी वाट ऽ न्यारी मजा !
न्हई हासतऽ फ्येसालुन जनु दात कशी दाउनऽ
पाण्ड दाविशी दात मजेशिर खुषींत तू हासुनऽ !

रूप सावळं दोगांचं तिचं पानी चमचम करी
डोल्यांमदुनी तसंऽ नाचतंऽ तुज्याबि काई तरी !
न्हइचऽ पानी पिकऽ पिकवितऽ घास मिलतसऽ म्हनून्
तुज्यामुळंऽ संवसार चालतो कान्जीभाकर मिळून्
डोङ्गरमाथां न्हई जलमली, थतून ये धावत
दूर तुजा बी गाव डोङ्गरी, आलिस माज्याहितऽ
न्हई झुलझुले गुङ्गत रानाराईमदुनी जशी
गान गात तूं खपशी शेतागवतांमदुनी तशी
निम्बर पड्ला कडक तरी पन न्हइच्या पान्यावरी
पिकऽ धरितरी जुमानीत नाय् तापाटी भाजरी
कटिन दीस किति आलऽ तरी मी तुझ्यामुळंऽ अस्तुरी !
कवां न डरतूं, मुखडा देखुन येत मना तरतरी।
उनामदी तापून समिन्दर पानी किति आटवी
न्हइला देई अगोट येतां ! अशी पिरत ग हई !
पिरतीसाटी तसा उनामदि खपतूं समदा दिस
रगताचंऽ बग पानी करतूं खुष्री न्हाव तूं असं
समिन्दराला न्हई भ्येटली डोय टेक तूं उरीं
पिटासारं चांदनऽ न्हाववे मला न सजणऽ दुरी !

———

: ९ :

लाल लाल या किसलय—ओठीं
सुमदन्तांची विलसे दाटी
सुहासिनी मनमोहक सृष्टी
मधुमासीं नटली !
झुळुकांनीं हालते पालवी
गमे करांहीं जनां पालवी
लाली गालीं यावी जावी
विनयवती बाला.
कुणीहि यावें, खुलें हिचें घर
थोर अनघ सुम—कोमल अन्तर
खावें प्यावें द्यावी ढेकर
व्हावें आनन्दी !
ताप संहरी शीत समीरण
कोकिल कुहु करि दुःखनिवारण
निर्झर रिझवी शिशुसम हांसुन
श्रम विसरे सारा !
उपवर झाली गभीर छाया
मुखावरी नव लागे याया
भरारुनी ये सारी काया
हो यौवनमुग्धा !

नभीं नाचती श्याम पयोधर
बघून हृदयीं न्यारी हुरहुर
पदर सावरी नजरहि अस्थिर
रोमाञ्चे देह !
कुणी धाडिले दूत काजवे ?
लगबगींत ते धावती जवें
विवाह निश्चित वर्षर्तुसवें
मुहूर्त मृगकालीं !
कडाडतो वर जलद—नगारा
सृष्टी झाली वर्षादारा
वीज करवली दावी तोरा
थयथयुनी नाचे !
व्योमामधुनी थुय्थुय् पाणी
इन्द्र वर्षुनी हिजला न्हाणी
निर्झर गाती मङ्गल गाणीं
दिव्य सोहळा हा !
तनुवरुनी जलओघ ओघळे
चिम्ब हरित तें वस्त्र पावळे
पाहुन सात्विक भाव सळसळे
ओलेती सृष्टी
नियमित जीवनवृष्टी व्हावी
धरणी धान्यें फुलुनी जावी
गाणीं आन्दाचीं गावीं
शुभसमयीं वाटे.

---

## : १० : स्त्रीहृदय !

नीलाकाश निवान्त ती रजनिची वेला समुल्लासिनी
सारे तारकपुञ्ज आणि नटली आकाश--मन्दाकिनी
व्योमांतील पहात थाट रमलीं गच्चींत दोघेंजण
एकान्तांत नितान्त शान्त समयीं रङ्गांत सम्भाषण !
"आकाशीं अनिरुद्ध हेममय हे प्रासाद कीं तारका
प्रेमाची प्रतिमा मनोहर उषा येतां बुडे द्वारका !"
"टोला छान, उषा निरागस नको साधी सुधी हासरी
रात्री लाञ्छित चन्द्रिका उडुमया ती काळतोंडी बरी !"
कांहीशा विषयान्तरार्थ वदला द्व्यर्थी तिला तो असे
"तारे कां तुटतात !" "ठाउक बरें" ती उत्तरीं धुसफुसे !
"गेला तोल जधीं निसर्गनियमां अव्हेरुनी चालती
ते स्वर्गांतुन खालती घसरली, धूळींत सामावती !"
तारा तोंच तुटे नभीं—बिलगली, भ्याली, दिसे बावरी
गेलें स्त्रीहृदयांत कांपत, शके वर्णू न तें वैखरी.

—÷—

## १ : विरोधाभास

तुज उत्सुक मी पहावया परि मार्गावर भेटतां तुला
सहजीं मुख खालती वळे करही सावरतात अञ्चला !
हृदयीं अनुराग जो स्फुरे न लपे अंशुक सावरूनही
लपवाछपवी तरी उगा घडते हातून मात्र नित्यही ।
मम दृष्टि तुला विमोहवी म्हणुनी भूवर दृष्टि लावते
करुनी तव वञ्चना अशी, बघते, चोरुन मोद पावते !
फसवून तुला मजा बघे, फसतें मीच खरोखरी पण !
तव ओसरते प्रसन्नता, दिसतां व्याकुळ होत मन्मन !
उलटी घडे कृती जरी प्रणया दर्शविण्या समुत्सुका
हृदयांतच भाव राहती झुरते खेळ करून मी फुका !

———

## : १२ : प्रपात

किर्र्र रानीं गान चाले
श्याम मूर्ती हांसरी
वाजवीते बांसरी !

डोलवीती वृक्ष माना
साथ देती कूजनें
घूमवीतां हा वनें

झुळुझुळू गान चाले
त्यांत ही सृष्टीनिमे
तींतुनी गाणें घुमे

कृष्ण कीं फुङ्कीत वेणू ?
काय या गोपी लता ?
वाटते ही शक्यता !

गान चाले दङ्ग झाल्या
नाचती तालावरी
जों निनादे बांसरी !

कृष्ण—नाथा पूजिताती
पुष्पपत्रें वाहुनी
आतपत्रें होउनी !

धावतो खालीं बघूनी
भावड्या या स्फुन्दती
मुग्ध गोपी सम्प्रती !

घे उडी गोपाल डोहीं ?
मर्दिण्या काळा अही ?
छे झऱ्याची झेप ही !

सप्त रङ्गांच्या कमानी
या तुषारीं शोभती
लक्ष धारा हांसती !

———

## : १३ : कळे कां—?

कळे कां, कां हंसे गाई ?
झरा कां झेप वा घेई ? ध्रु०
तिथें तीं पांच भावण्डें
रमूनी आपल्या छन्दें
करीतीं खेळ आनन्दें
मुखानें गुङ्गुनी कांहीं !
लपे ताई जरा भूमी
झणीं तो चार भावांनीं
तिच्या शोधार्थ धावूनी
तिथें केली असे घाई !
जलानें धावुनी जातां
जरा ना राहवे वाता
मिळालें तेजही झोता
तुषारीं व्योमही येई !
असा हा खेळ मायेचा
प्रपातीं पञ्चभूतांचा
तयांची बोबडी वाचा
असे आर्तांस अङ्गाई !

———

## : १४ : कोंकणी शकुन्तला

कुमारी मञ्जुस्वन वनचरी
नाचरी श्यामलशी हांसरी
आश्रमीं वाढवी तापस पश्चिमगिरी !

अवतरे स्वर्गातुन कन्यका
त्यजी हिज बहुधा कुणि मेनका
इतिहास कशाला हवा परी ठाउका ?

शैशवीं नित्य शिम्पुनी जला
प्रीतिनें तरुगण संवर्धिला
शश, चितळ, भेकरां अतिशय लावी लळा !

जसजसा काळ पुढें चालला
जिव्हाळा हळुहळु दूरावला
यौवनें मनाला वेध नवा लावला.

तुडवुनी उपवन नगरादिकां
झराझर ओघ पळे सारखा
निर्लज्ज धुन्द जणुं कोणी अभिसारिका

सखीच्या मनोगता जाणुनी
नवनवा साज देत मैत्रिणी
नटण्यास सुचे नच, हुरहुर चाले मनीं !

रुपेरी दुपार दे पातळ
भरजरी झगमगतें उज्वल
नच सुखावह जरी तलम मऊ मल्मल !

पुरविते सन्ध्या सायन्तनीं
नित नव्या बहुरङ्गी पैठणी
क्षणमात्र वापरी आणि फेकते झणीं !

नावडे निशादत्त अम्बर
उडूंच्या ठिपक्यांचें सुन्दर
जरि झाक मुलायम चन्देरी त्यावर !

शीतशी मतलय ये झुळुझुळू
कुजबुजे प्रियंवदेसम हळू
शान्त हो न अन्तर, अधिक सजे उचमळूं.

किनारीं कल्पवृक्ष नारळी
दाटुनी देत हिला सावली
विञ्झणे हालती तगमग तरि चालली !

सख्यांमधि शकुन्तला ही कुणी
दङ्गली प्रेमपत्र-लेखनीं
लिहितसे पुलीनीं लहरींनीं रेखुनी !

‘ रथस्वन गभीर कुठुनी इथं ? ’
नृपति ये दुष्यन्तहि अवचित !
स्फुट फेनराजिचीं दुकुलें रत्नाङ्कित !

जरी नच नोक झोक वरिवरी
नृपा हो प्रिय युवती डोङ्गरी
म्हणत कीं “वल्कलें अधिक मनोज्ञा परी!”

रोखितो सुमधन्वा आयुधें
भेटली खाडी जलधिस मुदें
भिन्नता जीवनीं नुरली, जुळलीं हृदें !

स्वयंवर कन्येचें पाहुनी
कण्वसा सह्यमुनी मागुनी
दे आशीर्वचनें शृङ्गकरां उभवुनी

“ नद्यांचा अनेक जरि हा पती
सुखद तुज होवो चिर सङ्गती
उद्धरो सन्तती सर्वदमन भूप्रती ! ”

———

## : १५ : दोन वनवासी

शिळाकातळांमधुनी निमळ खिदळतसे ओहळ
कातकरी तिथ कुणी पीतसे ओन्जळ ओन्जळ जळ
कडेकपारीं श्रमतो दिनभर हांसत वननिर्झर
उसन्त तिळभर नसे, राबुनी फोडी फत्तरथर !
श्रमजीवींना हंसत राबणें शिकवी हें जीवन
चुळकाभर जळ थकल्या जीवां उमेद दे नूतन.
गात राबतो कातकरीही गिरवुन याचे धडे
भुकी 'रानचा राजा' (!) जमवित फळें, मुळें, लाकडें !
दिनभर राबे श्रम विसराया हवीच प्याया 'बया' !
पेज कण्हेरी असो नसो मग पर्वा नाहीं तया !
'अम्मल' करणें अधःपतन ही नसे कल्पना जरा
परिस्थितीची नसे दादही जाई खालीं झरा !
झुळझुळ गुञ्जत खडकांमधुनी श्रमतें निशिदिन जळ
भयाण भोतीं निसर्ग बसला आ वासुन केवळ !
वनवासी हा वणवण भटकत पोटास्तव खपतसे
परिस्थितीचे पाश भयानक त्यांत बिचारा फसे
जीवन यांचें जगतासाठीं श्रमती हांसत सदा
भयकर निष्ठुर भवती भेसुर विकट हंसो आपदा !

———

## : १६ : क्रान्त्युत्तर

सम्पलेच दुर्दिन शिशिराचे भीषण
सहकार बहरले, धुमारुनी ये वन
जाळतो ग्रीष्म परि अङ्गारा वर्षुन !

करपतें मनोहर वासन्तिक वैभव
अन्तरीं भीतिचें थरकांपक तांडव
"नव–युगोत्सवांतहि काय न सौख्योद्भव ?"

मरतात तरुलता या जरि चन्डातपें
दमदार तिथें नव रोप भरारूं शके
या हिरव्या वीरां व्योम पडे थोडकें !

शमि, खदिर आणखी आग नवी ओकती
दावाग्नि आहुती घेवो परि सङ्गती
भस्म होत कण्टक ! अग्निशुद्ध भूसती !

जलकोष आटतां नको बनूं व्याकुल
त्यामुळें सुधेसम वर्षा सिञ्चिल जल
भू शस्यश्याम अन् हास्य वनीं मङ्गल !

———

## : १७ : बाहेर आणि आंत

वर्षानें विभवें उधळलीं लोभसवाणीं हीं
शालू मखमलिचा मिळाला कोंकणभूलाही
माना लववूनी तरुलता या या म्हणताती
प्रेमाश्रू नयनीं तरारुन टपटप गळताती !
साग फुलूनीया हंसत कीं स्वागत करिताती
पखरण सुमनांची चालवित पायघड्यांसाठीं
चढत खलाटी ही कुशीमधि सह्याच्या शिरली
भातांचीं रोपें तयांतुन हारीनें भरलीं

वायूच्या लहरी जोजवित तयांस मृदु हातें
चमक गोड भरुनी शरीरीं सरसरुनी जाते !

झुलुकांनीं उठती भराभर लाटावर लाटा
हिरव्या जलधीला नाचवी वायुशशी आतां

झुलु झुलु त्यामधुनी प्रवाहीं रुपेंच खळखळतें
पाचूंतुन मोत्यें पिकविते किमयेनें जळ तें !

पृथ्वीवर हंसरी अन्तरीं आगच धगधगती
वैभव वरवर हें आंत जन दैन्यें तडफडती !

शेतकरी श्रमुनी पिकवितो हें सोनें मोतीं
नेत धनी पोतीं कुळाकर भुकी अर्धपोटी !

जिवन्त भूतें तीं, चिपाडें झालीं निष्प्राण
रक्तशोषणानें बिचारे दुबळे हैराण !

स्थिति बघुनी त्यांची सहृदया डबडबणें डोळे
रक्तहि सळसळणें अनावर विचार—कल्लोळें

हृदीं क्रान्तिकारीं वादळें नव नव उठुनीया
कुळांस सुखवाया हिरीरी ये दुर्दमनीया

जनता दीन, परी अन्तरीं नारायण सुप्त
यांतुन अरिदमना प्रकटणें नृसिंह, हो भक्त !

———

: १८ :

## तुफान

दर्याला विक्राळ आलें तुफान
लाटांचें भेसूर चाले थैमान
भरून अङ्गीं कांपरें
नभीं न सूर्य सञ्चरे
नाखवा छातीचा भीति न त्यास
कोळीण लाटांत ऊभी उदास !
दर्याला विक्राळ आलें तुफान
कडाड चावतो दात सैतान
घे लाट पाताळ भेट
उफाळे नी नभीं थेट

ढग रेड्यावर यमाचें ठाण
वीज–पाश फेकी ओढाया प्राण !

दर्याला विक्राळ आलें तुफान
बळी घ्याया झाला काळ बेभान
यमाची दूतिका लाट
धावते पिशी बेफाट
टकरा खडकां देत हो चूर
किनारीं नाजुक धड्धडे ऊर !

दर्याला विक्राळ आलें तुफान
नावरे करून शर्थ सुकाण
आभाळ भयाण काळें
मोकाट तारूं जहालें
रोरावे भरारा वारा नाचत
शीड फडाडूनी दोरा कांचत !

दर्याला विक्राळ आलें तुफान
सोसावे होडी कीं घोडी तुफान
टपोरीं मोत्यें वरून
उधळी मोदें वरूण
प्रीतिभेट इन्द्रधनु पहात
चुम्बी किनाऱ्याला हांसत लाट !

———

## १९ : आवाहन

आश्वासित शासित ये साम्यदेवते !
दलित दुःखमोचनार्थ ये, जयोऽस्तुते ! ध्रु०
तक्तांवर दुर्योधन सम्प्रती किती
जे जनतास्वातन्त्र्या नित्य तुडविती
कृत्रिमशा सीमांनीं भेद निर्मुनी
नर नरास गिळित जसे हिंस्रपशु वनीं
उन्मादें सैतानच नाचवीं भुतें !
व्यूहामधिं अभिमन्यू बाळ सापडे
थाम्बव हें युवक–मरण जीव तडफडे !

झुन्जतसू तुटुन झटुन तत्वरक्षणा
जनसुखार्थ समतेची करित घोषणा
अरि कापव, दाखव तव रूप रौद्र तें !
हम्बरतें अगतिक तव दीन वासरूं
धाव नन्दिनी नको चरू नको ठरू
अडवाया तव गतीस कोण शक्त ना
दिव्यत्वें निर्मिशील सैन्य रक्षणा !
किति बघशी सत्व ? भक्त सङ्कटीं रुते !
'साह्य योग्य कीं अयोग्य' गूढ हें कुणा
नव गीता साङ्गुन कर मार्गदर्शना
बुद्धिभेद किती सुचनां करित दुर्जन
ज्ञान सत्य हरण करो द्वेष—कारण
तव वचनीं मोहिनीच अमृत वरतसे !
परवशता विषमा स्थिति हृदयदारका
नष्ट करायास निघूं हो सहाय्यका
ऊच्चध्येय—तारकेस गाठण्या उडूं
साहय वियानांतुन दे, वा पडूं, बुडूं !
साधुपरित्राण, पतितपावन व्रते !

—÷—

## : २० : शृङ्खलानाद्

भोतीं मीतिद सङ्गिनी, हिणविती, खळ्खळ् स्वनें शृङ्खला
सत्तास्थापित न्याय त्यांतुन वदे ( ठावेंच तो आन्धळा !)
" वर्गध्वंसक त्या अशान्ति-जनकां माथेफिरूंनां भुकी
टाकी डाम्बून बन्धनीं, करितसे मी शान्तिभक्तां सुखी "
भोतीं मीतिद सङ्गिनी, हिणविती खळ्खळ् स्वनें शृङ्खला
सम्राट् तोलित राजदण्ड गुरके ( भावी भयें खङ्गला ! )
" स्वातन्त्र्यास्तव कष्टती, जनपदा साह्यार्थ पाचारती
खासें वैभव हें मिळें चळवळ्या त्या देशभक्तांप्रती ! "
भोतीं मीतिद सङ्गिनी, हिणविती खळ्खळ् स्वनें शृङ्खला
दे आश्वासन दण्डितां स्वनच हा ! उत्तेजुनी दे बला !
" सत्त्वें रुजतात जों, फिरविते सत्ता वरी नाङ्गर !
तेजें तीं उधळून होत विजयीं काळें कधीं सत्वर !
सोसा हे छळ राक्षसी विषमता होणार अन्तर्हित
ऐक्याचीं विजयध्वजा फडकणें आनन्द-साम्याङ्कित ! "

———

## पाण्ढरे ढग

व्योमभूमी शुभ्र मेघें झाकळूनी जातसे
कापसाचें पीक साचें मस्त कीं आलें असे !
हें जळो सौन्दर्य आणी पाय जें पोटांवरी
नष्ट आशांचीं कुळांच्या हीं पिशाचें पाण्ढरीं !
सावकारी रीत मारी दीन, हर्म्यां भूषवी
व्योम हांसे, दीन करा हुहुरे दुःखें भुवीं
पाण्ढऱ्या पायांमुळें ह्या तोण्डचें पाणी पळे
'खण्ड कैसा द्यावयाचा ? भाकरी कैशी मिळे ?'
जीवनाभावीं जहाली शुष्क हीं सारीं पिकें
मोतिदाणे व्हावयाचे फोल तें होई निकें
हस्तनक्षत्रीं झरावीं मौक्तिकें शेतावरी
तींच सारीं साटवीलीं शुभ्र या मेघान्तरीं !
तुम्बली व्योमांत लक्ष्मी पाझरो वेळीं जगीं
दीन पोटार्थी जनांना त्याविना ना पोटगी !

## : २२ : भाईस–

सनातनींचा जथा पुराणा
 पोपटपञ्ची पण्डित घेण्डें
 म्हणोत गर्जुन हीं पाखण्डें
 विनाशकारी नव थोताण्डें
हरहर ! तद्धच कळत न त्यांना !

मतामतांचा विचित्रखाना
 विरोध करितिल आइतखाऊ
 आणिक त्यांचे भोजनभाऊ
 सत्ताधिश अन् लक्ष्मीवाहू
कोण शहाणा, कोण दिवाणा !

७२०२९



दलितांचें हित करुन बहाणा
धनिकहि करिती मधुनी चळवळ
तुरुङ्गांतही त्यांची चङ्गळ !
बुवागिरीची त्यांची कळकळ
पिचती दीनच, असा जमाना !

लायक नायक धरो सुकाणा
वादळांतुनी न्याया होडी
करि जो पेचांवर कुरघोडी
वारें फिरतें शिडांस जोडी
श्रमिकांस्तव सुख ज्याचा बाणा !

शब्दशूर तो निष्क्रिय जाणा
वठत न हातुन तत्वें पटलीं
भिववित संशय बुजगभावलीं
असलीं व्हा नच बुळीं बावळीं
आचरणाची हिम्मत आणा !

धडाडीत न्या पुढें निशाणा
डरूं नका कीं आपण थोडे
प्रवाहा स्वयें मिळतिल ओढे
विरोधगिरिही पडतिल थोडे
यश येणारच सत्त्वांना !

———

# ३ : वादळी लाटा

ये वर्षर्तु, सुधा सरींतुन झरे अर्पीत सञ्जीवन
ग्रीष्मानें वठलीं पुन्हा विनटतीं झाडें, लता, माळही
तेंव्हां वादळ सागरीं गरजुनी वीची म्हणे प्रत्यहीं
" न्या नौका परि जन्मसिद्ध जलधी माझा मनीं ठेउन
सौजन्यें जग चालतें तर नको होतें तुम्हां सांगणें
देतां आश्रय हातपाय पसरी दात्यासही हाकली
सौजन्यीं कटु नीत धूर्त दिसते आम्हां अशी झाकली
तेंव्हां साङ्गतसूं चुकाल तर तें मृत्यूस बोलावणें ! "
" माझा भारत " व्यर्थ आज वदणें तो बन्धनीं साम्प्रत
आम्हीं आज गुलाम अन्न न मिळे कष्टून पोटांप्रत !
पापांचा परिपाक कालमहिमा, हें फोल वाग्डम्बर
लाटांच्यासम जागरूक नव्हतों बान्धून तैं कम्बर !
आतां सर्व कळून अन्तर तुटे मी हिन्डतां सैकतीं
जाऊं या उखडून बन्ध गमतें स्वान्तन्त्र्ययुद्धामधीं !

## : २४ : रत्नाकरा-

रत्नाकरा ! गर्जना धीर तूझी सदा साठवीं मी श्रुतीसम्पुटीं
विस्फारुनी नेत्रविस्तार पाही तशी विस्मयें हो मती हिम्पुटी—
लाटा जमीनीकडे धांव घेती जवें आक्रमायास कीं मेदिनी
आशावती जन्मते ये पुढे घे उशी वर्तुलाकार उल्हासुनी !
खुण्टे तिचा मार्ग, जाई फुटूनी, हंसे गर्जुनी प्राण जाई तरी
येते दुजी तों तशी लाट वाटे तिचा जन्म होई पुन्हां सत्वरीं
यावें, फुटावें, हंसावें, निमावें ! अखण्डीत चाले अशी मालिका
स्फूर्ती खरी ही ! कळे जीव जातो तरी तोच हव्यास येथें निका
आतां कळे गूढ, कल्पान्त होतां उठे लाट एकेक शैलासम
साम्राज्य विश्वावरी एकछत्री तुझें सागरा चालतें दुर्दम
सत्ता तशी थोर सम्पादण्याला तुझें चाललें नित्य हें ताण्डव
लाटा हुतात्मे, जयें होम केला जिवाचा हंसूनी स्वराज्यास्तव
स्वातंत्र्य संपादण्याला अम्हीही झटूं हिन्दवासी तुझ्यासारखे
प्रज्वाळुनी दीप सारे प्रदीपें करूं दास्य कल्पान्त राहूं सु

———

## : २५ : सुखदुःखे समे कृत्वा–

जलधे ! तुझ्या नित मोहिमा नव येत आक्रमण्या धरा
हृदयान्तरीं विजयोत्सुका उठती तरङ्गपरम्परा !
भरती तुला मग येतसे, कळसास पोंचत वैभव
तव ध्येय लाभतसे तुला लहरी करी तरि ताण्डव
पुढती निसर्गक्रमामुळें तव येतसें पद मागुतें
सुकतींतही खचशी न तूं लहरी खळाळत नाचते !
धरणी करांतुन जी सुटे हिणवून हांसतसे पुढें
तिजला पुन्हा हटवावया उसळून वीचिचमू लढे
मिळवावया विभवा जनीं तुजसारखी नच लालसा
विरळा दिसे, परि लाभतां जय आळसाप्रति वारसा !
जन आपदीं हृदयीं खचे, नच यत्नही करण्या शके
सुखदुःख हीं सम मानुनी नित कष्टते जन थोडके
भरती असो, सुकती असो तव लाट हांसत कष्टत
म्हणुनी असे तव सङ्गती जनतेप्रती प्रिय सन्तत !

———

## : २६ : अल्पकालची परवशता

अवदशा कितीही येवो, सुपिक भू मिळाली,
भारता निसर्गें केलें फार भाग्यशाली ! ध्रु०
शतक दोन घालो येथें पारतन्त्र्य पिङ्गा,
स्वर्णभूमि विभवा टाको पोखरून भुङ्गा,
लाभतां जराशी सन्धी येउ पूर्वरङ्गा,
आणि सर्व हानी भरणें खास अल्पकालीं !
जन्मले हजारो येथें कर्मवीर थोर,
येथ बुद्धिमन्ताचीही मालिका अपार,
एक लाट जातां दुसरी पाठिशीं तयार !
पारतन्त्र्य राहिल कैसें सर्वकाल भालीं ?
सळसळो नसनसीं भक्ती मात्र मायभूची
जनमनीं खन्त जुलुमाची जो तयांस जाची.
स्वत्वजाणिवेनें जनता वागुंदे सदाची
अल्पकाल मग परवशता राहिली कपाळीं !

———

## : २७ : सह्याद्रि

जगाच्या पर्वतामाजीं जरी ही वामनी मूर्ती
खनी स्वातन्त्र्यवीरांची, अशी सह्याद्रिची कीर्ती !
गिरी हा कर्णसा दाता, जला दे मुक्त हातांनीं
रुपें देशान्तरीं धावे खळाळूनी प्रपातांनीं !
खरें ग्रीष्मीं जगा द्याया नुरे सह्यासवें कांहीं
रिता वर्षून झालेल्या शरद् मेघा न मोठाई !
करी हा वज्रमुष्टीनें पयोधीच्या दला चूर
प्रहारा वीचि खाऊनी पळे आक्रन्दुनी दूर !
इथें भूगोलसञ्चारी निमाल्या यावनी लाटा
तडाखा मृत्यु देणारा मिळाला धूर्त सम्राटा !
बटूनें लोटला जैसा बळी सम्राट पाताळीं
अशा पुत्रप्रतापांनीं गिरीला ऊचता आली !
स्वराज्यस्थापनेसाठीं विभूती येथ जन्माल्या
भराऱ्या सह्यपुत्रांनीं पुन्हा वैनायकी घ्याव्या !

---

## : २८ : हांस जरासा

( एका इङ्ग्रजी कवितेच्या आधारें )

—०×०—

हांस जरासा, हांस जरासा, जीवितयात्रा जोंवरती
केवळ सुख तुज असतां नच तर सङ्कट करि जैं गुङ्ग मती !
उदासीनता अन् सुस्कारे चिन्तेला प्रिय बहु असती
स्मितावलोकें चिन्ता पळते, जशी प्रकाशें तिमिर गती !
हांस जरासा, हास जरासा, जीवितभर तूं हेंच करी
जिवास दुःखें असावयाचीं सदाकदाचीं कांहिंतरी !
उदास होउन कुढूं नको तूं दुःखांची गणती करित
नशिबीं आलेला विष प्याला सॉक्रेटिससा पी हंसत !
कुणी गाञ्जले पथीं भेटतां स्मितवदनें तूं चाल तदा
विषण्णमुख जणु सुरी जिव्हारीं, स्मित उत्तेजन पान्थ हृदा
आम्बट चर्या करुन दाखवूं नको ' वाट अति बिकट ' वृथा
जरा हांसुनी सुहास्य किरणें उजळी जीवनरूपपथा !
विफल यत्न तरि हंसत करी श्रम, यत्ना येतिल विभवफळें
रडत बसुन नच विभव लाभतें ! हंसत कष्टतो त्यास मिळे !
त्यांतुन सङ्कट चालुन येतां झुञ्ज जरा नच डगमगतां
हांस जरासा निश्वासांतुन टिपें टपाटप टपटपतां !

———

: २९ :

## कविरायास–

स्वातन्त्र्य सङ्गरीं फुङ्क कवे ! रणभेरी
उसळवी शौर्य अन्तरीं ! ध्रु०

हें जनस्थान तूं भर तव हुङ्कारांनीं
स्फूर्तीनें टाक व्यापुनी

तुजवीण कुणाच्या गीतीं वन उमटविल
निज हृदयाची खळबळ !

तुज ठाउक तर घे तान,
कर सारें जग बेभान
स्फूर्तिनें करी उत्तान
चल कळव जगाला निसर्ग–हृदय–खुमारी

ओतुनी गीत–माधुरी !
रवि–उदय–काल ही वेला चैतन्याची
जणुं उधळे नाविन्याची !
जनमनोरथ फुलें आशातरुवर फुललीं
सुखगन्धें कोन्दाटलीं !
वन–वातावरणांतून
श्वास घे भरून परिपूर्ण
निश्वसीं नसा छेडून
किमयेनें उसळव मधुमन्द गान–लहरी
नाचवी भुवन त्यावरी !

बघ वारें कसलें खेळतसे भवतालीं
त्यांतुनी स्फूर्ति घे भली
दे काल साथ ज्यां अशीच वितरीं कवनें
रणदुन्दुभि बघ दुमदुमे
कण्टाळत पाहुन वाट
वीरात्मे आकाशांत
तूंच बा स्फूर्तिचा भाट
तरि कवे ! पञ्चमीं कुहुकुहु कूजन वितरी
अद्वितीय रव-निर्झरी !

———

: ३० :

क्रान्तिच्या पताका दिगन्तरीं
पाहतां हिरीरी भरत उरीं !
        तमसंहारक उगवे दिनकर
        तरवारीसम लखलखती कर
        ध्वजा फडकते लाल नभावर
हा सुदिन उल्हसित मना करी !
        हृदय धडधडे स्वागतार्थ मम
        घेत भरारी गात मनोरम
        सान जिवाचा सानच विक्रम
अन्तरांतली ही गीत–झरी !

———

## : ३१ : पावसाचे थेम्ब

सर सर सर येती थेम्ब हे पावसाचे
टप टप टप त्यांच्या नाद कीं पावलांचे !
पळत बघुन काळ्या मेघ-बागूलबोवा
बिलगत अवनींला, माउली दे विसांवा !
चमकत जलबिन्दू, छे जणू गोल मोतीं
पटपट उचलावीं लोभ हा होत चित्तीं,
तरुवर झरतां तीं नाचतीं सर्व पानें
सहचर कवळीती एकमकां मजेनें
हरहर ! विरतातीं पाहतां पाहतां तीं
टपकन जणु पानें आसवें ढाळतातीं !
अविरत झरती या अम्बरांतून धारा
वन उपवन सिञ्ची मेघरूपी हजारा !
खिदळत फिरण्याला चालले सर्व बिन्दू
जलकणच जुटीनें निर्मिती थोर सिन्धू !

———

: ३२ :

## अपूर्णता

किरण–शलाका उदयास्ताची
नवरङ्गें मेघां नटवी
सुधामन्थनीं ग्रह–उडु लोणी !
किरण रश्मिची चन्द्र रवी !
कोंकण–निर्झर फूत्कारत जणुं
सर्पासम वर्षाकालीं
स्वर्ण–सुमांच्या बुट्ट्यांचा कीं
शालू हरित लता ल्याली !
झुलुक डोलवी पल्लव सळसळ
बघतां खुद्कन चित्त हंसे !
शब्दचित्र परि जसेंचें तसें
ठसे मनीं उमटवित नसे !

———

## ३२ : साम्य

साम्य उगमतां रम्य गमतसे अभिन्न उगमस्थान
उपवनीं नित्य मोगरी
प्रसवती फुलें हांसरीं
तो वास भरे अन्तरीं
त्याच परिमळा रानलतांहीं उधळुन हरिलें भान
फेकते शरदशर्वरी
दंवकणांस पाचूवरी
मौक्तिकेंच तीं हांसरी
स्पर्श रविकरें करतां सरसर पावत अन्तर्धान
रमणिचें रूप अचुकसें
हावभाव अन् तें हंसें
चित्रांत कुठेंतरी दिसे
अवचित रेखांतुन अवतरलें साम्यच मोदनिधान !
नर कुठें असो भूवरी
वरिवरि विविधता जरी
साम्य त्यांत नानापरी
भिन्नतेस कीं आदिवृत्तीचें सूत्र गुम्फते छान !
व्यवहार मानवी कधीं
दिसतात निसर्गामधीं
अद्वैत गुङ्गवीत धी
तास तास मी निश्चल बसतों विस्मरून अवधान !

———

## : ३४ : लेजिम

लेजिम वाजे खळखळ छूम्
जवान झाले घामाघूम्
    तबला घुमुनी साथ करी
    जोम नवा अङ्गांत भरी
नवा पवित्रा जसा हुकूम्
रणावेश कीं ये वहरून !

———

: ३५ :

## प्रश्नोत्तर

**कविः—**

साङ्ग तूं पिका
   गान कशा ? त्रास घशा
हा नकां निका ?
"गा" न कुणि वदे
   उगिच गान ? जात मान
गीत त्यज मुदें
साङ्ग ज्यामुळें
   गान येत, तान घेत !
गूढ नाकळे !

**कोकिळाः—**

विश्व गातसे
   श्रवुन गान नुरत भान
मूक मी बसें
गान त्या स्वरीं
   गावयास घेइ ध्यास
कमवि वैखरी !
मधु मधू जधीं
   येत वान गोड गान
बघतसे तधीं.

———

: ३६ :

## जीवनानन्द

यदृच्छा करो सर्व रूपान्तरें
घडो कार्य वा आदिशक्तीकरें ! ध्रु.
अणू एकदां एकता पावतां
परब्रह्म पिण्डांतुनी प्रस्फुरे !
वरीच्या परार्धांश अव्यक्त ते
अणू रूप आकार घेती त्वरें
तयां जीवनाची मजा वाटली
निसर्गांत आनन्द तो सञ्चरे !
म्हणे मेघ उत्पत्ति गीतांप्रती
करी तारका गान तारस्वरें
झऱ्याच्या खळाळांतुनी गीत ये
सदा ध्यास तो घेतला सागरें
तशीं पाखरें गीत आलापितीं
अनन्तातुनी साथ हो सुस्वरें
मिळे ज्यास अस्तित्व–जाणीव त्या
न कां जीवनानन्द गावा नरें ?
प्रकाशीं, जळीं, वायुमाजीं, नभीं
कुठेंही अणू हांसरे धांवरे !

———

## १ : काऊ चिऊ !

मूठ चिमुकली
मोत्यें उधळी !
भुरभुर वरुनी
येत उतरुनी,
चिमण्या चिमण्या
कण्या वेचण्या
नाचत टणटण
वेचित कणकण
चिंवचिंव बोलत
पिलांस भरवित
चोंचिस त्यांच्या
रङ्ग विड्याचा !

काऊ काळा
बागुल आला !
फिरत करकरे !
बुबुळ गरगरे !
थवा भरारा
पळे विचारा

बळी मिजाशी
दीन उपाशी !

———

## : ३८ : मंमं

शाहणी आमची तशी शशी
चटदिशीं जेवते छान कशी !
        चाटित जिभल्या मनी हावरी
        तुला न, जा गे, शूक मान्जरी
        बाळ सम्पवी भात लवकरी
यी करुन तिला कां बोलवशी ?
        दूधभात ही खाई माऊ
        मंमं कर बघ आला काऊ
        घास चिऊचा आतां घेऊं
खा हम्मा भरभर खात जशी !
        बघते तिज कर 'टुकटुक माकड'
        दूध भात मी खाई पापड ?
        इपुट शिपुट खा चल मामाकड
हो, पोपोंतुन मग भूर अशी !'

———

## : ३९ : पापा

हांसुनी वाकवाकुनी बघे सोनुली
        नेसली दिसे ही साडी जी नवी काल आणिली
मुरडुनी पदर सावरी प्रौढ जशि कुणी
        थाटांत चिमुरडी चाले युवतिची ऐट आणुनी !
सावरी घोळ धावरा भरभरा करीं
        भुरु भुरू तोंच केसांच्या पलटणी कपाळावरी
जलबिन्दु डंवरले मुखीं–गोलमौक्तिकें
        मुख होई गोरेंमोरें ! गाल कीं लाल माणकें !
फुगवुनी गाल पुटपुटे, जराशी रुसे
        'रुसुबाइ रुसू' मी गाणें बोलतां खुलूनी हंसे
अवतार असा पाहुनी सहज चुम्बिली
        तों म्हणे "जाहलें मोठी, कां पापा घेतां तली?"
भूमिका योग्य युवतिच्या तिच्या भावना
        विसरलों कौतुकावेशें बोचलें जरासें मना !
"खरंच कीं" म्हणत झडकरी दूर सारली
        बिलगुनी, म्हणे तों "पापा घ्या लहान मी आपली !"

———

## : ४० : घोडा घोडा

घोडा धांवे टिप् टाप् टूप्
स्वार पिटाळी त्याला खूप
बघून बाळा येत हुरूप !

दौडत राजस हा भरधाव्
तोण्डानें करि 'टकाव्' 'टकाव्'
काठीला घोड्याचें रूप् !

खरा न वाटे परि घोडा
मनांत रुसला मग थोडा
विचारांत हा गढुनी चूप् !

वाजत आतां टाप झकास्
लगाम हातीं ओढायास्
बाळ उल्हसे मुदें अमूप् !

पायाखालीं करवण्ट्या
दोरी खेचित वर पठ्या
स्वार असा पळतो तद्रूप् !

———

## : ४१ : आवडतें माणूस

" कोण आवडे, साङ्गतों गडे
हसूं नका, बोलतों मी थोडें बोबडें !
आई कली माया भाली
पापे घेते एकसाली
लाड कली फाल माझे तें न आवडे !
बाबा कधीं बोलावती
'श्लीग' काढण्या लावती
घेती गाल, देती माल चुकतां धडे !
वैनीची नी माझी गट्टी
देई होड्या, साङ्गे गोष्टी
'सूनबाई' हांक येतां धान्दल उडे !
साङ्गूं दादाची जम्मत?
नांव वैनीचें 'घलांत !'
मला खाऊ 'घलांत' दे माळा आकडे !
दिसे छानशी बाहुली
पली बोले नाहीं खुळी
भुईंवली पडे तली मुळीं ना लडे !
पोंक आलें, हले मान
आजी साङ्गे मौजा छान
कोणी लागावतां तिच्या कुशींत दडे !

—÷—

## : ४२ : अङ्गाईतील प्रबोधन

झुलुकांनो दङ्गा पुरे
झोपेस ये फूल । माझें । झोपेस ये फूल
कुरळांना ओढूं नका उचला पाऊल !

मृदुस्पर्शें जोजवीत
जगांत जा गात । आधीं । जगांत जा गात
श्रान्त वाट पाहतात येतो कधीं वात

झुलुकांच्या पङ्खावर
नेई जादूगार । झोप । नेई जादूगार
मोहिनीच्या दिव्य मन्त्रें शीण हो पसार

माझ्या राजसाच्या गालीं
रङ्गे उषःकाल । रम्य । रङ्गे उषःकाल
गुलाबाचीं फुलें आली गुलाबी नी लाल !

सुखांतलें सौन्दर्य हें
लाभे तुला बाळ । दैवें । लाभे तुला बाळ
दलितांच्या बालकांना कुस्करीती हाल !

कोवळ्या त्या कलिकांची
जों बाल्य सकाळ । हांसे । जों बाल्य सकाळ
तोंच लाली पुसण्या ये बारांची आहाळ

जाणीवेनें जीव कापे
घोटाळतें गीत । मुखीं । घोटाळतें गीत
काळी पार्श्वभू चित्रांची करी भयभीत ।

सहारांत संसाराच्या
अन्नाचीही भ्रान्त । त्यांना । अन्नाचीही भ्रान्त
प्रीति आशा हिरवळी हुरूप देतात !

मार्ग चुके ठेंचाळती
घोर अन्धारांत । दीन । घोर अन्धारांत
भव्यभाल माझें बाळ उजळील वाट !

—×—

## : ४३ उषा

बालिका ही चारुता मूर्तिमन्त
अङ्गकान्ती कोवळी लुसलुशीत
ऐक्य कमलाचें आणि गुलाबाचें
सृष्टिमाजींही जें न दिसायाचें !

हांसरे ते काळेच तिचे डोळे
लाजरे वा भाबडे वा न भोळे
दृष्टि दृष्टीला सहज मिळायाची
तेज अपुलें पटवून फिरायाची !

निसर्गानें निर्मिलें रूप गोड
त्यास वसनांची मिळे छान जोड
मुकुल कलिका सर्वांस मोहवीत
किती सुन्दर दिसणार यौवनांत ?
उषा पावन ही रविस जन्मदात्री
काय 'सम्भव' नाशील घोर रात्री ?

———

## : ४६ : अरूर !

कचेरींत बहु काम, भागलों, पडलों खाटेवरी
अङ्गणीं जेवण झाल्यावरी.
शरद्ऋतूचें प्रसन्न अम्बर अथाङ्ग गहिरें वर
पुनव करि मस्त सुधासागर !
" रमणी राका–शशी, तारका सुमनें वेचित फिरे "
कल्पना यक्षभूत सञ्चरे !
" स्वर्गङ्गेची माळ गुम्फिता इन्दुमुखी ही परी
पाहते कुठेंतरी भिरिभिरी
रूपसुन्दरी अमरपुरीची शची स्मराची रती
प्रतीक्षा करित पतीचीच ती !
सकलकलाङ्कित सुहास्यमण्डित ललाम ललनांतलें
धन्य तो सुभग जया लाभलें
परि असा कसा तो गृहीं नको कां वेळेवर यावया
शिणवितो उगाच रत्नास या !
माळ घातली अशा अरसिका तिनें कशाला पण ?
कोणही नव्हता कां मजसम ? "
" हंऽ उठावंऽ गडे उशीर झाला किती "
मृदु वचें प्रियेच्या येत मला जागृती
बावरून उठलों, बघुन हंसे गोड ती ?
इन्दुच्या करीं माळ फुलांची ! चकित, धन्य मी खुषी
पुरें पण, पानीं लपला शशी ! !

—÷—

## : ४५ : विवाहोत्तर

गुरुत्वाकर्षणें पृथ्वी शशाङ्का नाचवी भोतीं
विलोलाक्षी ! 'गुरुत्वानें' तुला ती लाभली शक्ति
पुरे जादूगिरी, झालों मनानें एकमेकांची
जरूरी प्रीतिला नाहीं अशा बाह्योपचारांची !
करी प्रारम्भकालीं जी झरी लाडिक लास्याला
तिचें चाञ्चल्य लोपूनी पुढें गाम्भीर्य ओघाला !
भुलें मी मञ्जु बोलांनीं, उगा मारा कटाक्षांचा
ससा नादें वळे तेव्हां न ओढी व्याध प्रत्यञ्चा !
कशाला आरुणीवेषा उषा रङ्गून ये गालीं
मती भाम्बावते जादू तुझी पाहून बङ्गाली !
खळी गालीं सुहास्याची, कधीं दन्तप्रभा फांके
पयोधी मौक्तिकें चंद्रा हंसूनी दाखवी कां गे ?
कचांची भुर्भुरे सेना, ध्वजा स्वातन्त्र्यवृत्तीची
समीरें सागरीं जैशी भरारी उन्च वीचींची !
तुझ्या स्फुल्लिङ्ग नेत्रीं, यत्-प्रभा ओसण्डते देहीं
समीरें प्रस्फुरे ज्वाला-शिखा त्यांचीच कीं डोई
न वा हो प्यार देखावा कुणा फुलपाखरी जीवां
तसा मी वाटुनी किंवा हुषारीचा तुझा कावा ?
गुलाबें मुग्ध गोडावा कसा साङ्गून सोडावा ?
तुझी नैसर्गिकी जादू सदा सम्मोहवी जीवा !

---

## : ४६ : अऱ्र !

कचेरींत बहु काम, भागलों, पडलों खाटेवरी
अङ्गणीं जेवण झाल्यावरी.
शरदृतूचें प्रसन्न अम्बर अथाङ्ग गहिरें वर
पुनव करि मस्त सुधासागर !
" रमणी राका–शशी, तारका सुमनें वेचित फिरे "
कल्पना यक्षभूत सञ्चरे !
" स्वर्गङ्गेची माळ गुम्फिता इन्दुमुखी ही परी
पाहते कुठेंतरी भिरिभिरी
रूपसुन्दरी अमरपुरीची शची स्मराची रती
प्रतीक्षा करित पतीचीच ती !
सकलकलाङ्कित सुहास्यमण्डित ललाम ललनांतलें
धन्य तो सुभग जया लाभलें
परि असा कसा तो गृहीं नको कां वेळेवर यावया
शिणवितो उगाच रत्नास या !
माळ घातली अशा अरसिका तिनें कशाला पण ?
कोणही नव्हता कां मजसम ? "
" हंऽ उठावंऽ गडे उशीर झाला किती "
मृदु वचें प्रियेच्या येत मला जागृती
बावरून उठलों, बघुन हंसे गोड ती !
इन्दुच्या करीं माळ फुलांची ! चकित, धन्य मी खुषी
पुरें पण, पानीं लपला शशी ! !

—÷—

## ४७

प्रिय पत्नीविरहानें
इन्दु—वीण आकाशाची
कळा तुझ्या अन्तराची !
    पूस नेत्र पहा वर
    लुकलुकतें अम्बर
    सूक्ष्म नेत्रें अवधार
सूर्यबिम्बें ग्रहमाला
नानाविध तेजोराशी
पाहशील बहु शशी !

अन्तराळीं तरङ्गती
प्रेम साम्राज्याचा गांव
लोपे जाणीवेची शींव.

नामहीन भेदहीन
तेथ सारे आत्मे अन्तीं
परस्परांना भेटती !

मृत्युनन्तर निश्चयें
तुझ्या जीवाची लाडकी
तेथें भेटणार सखी !

जावो हृदय फाडूनी
सरोवरातें वञ्चुनी
सागरातें कल्लोलिनी !

परी होतां रूपान्तर
भेटताती मेघावर
निर्झरीणी सरोवर !

भिन्न ओघ अन्तीं होती
बाष्परूपें एकजीव
मरणानें तैसे जीव !

रथचक्र गिळो पृथ्वी
कर्ण काय खन्त करी ?
लढ, मर शूरापरी !

———

## : ४८ : लग्नचाकर !

[१]

लग्नाला धा इसा काडिलऽरुपयऽमाज्या मिनी
ध्येतसऽकागुद लिवुनी धनी !
व्हतूं म्हनत मी “ कशास इक्ता करज हवा काडया ? ”
गोत पर करिना काई दया !
जेवन मारी होविच नाय् तर वाळित त्यें टाकिल
गुडगुडी आग बन्द होइल
मग कुनी करावा इचार हा वाउगा
मिनि तसाच बसलूं बगऽत सारंऽ उगा
संपलऽ धा इसा समूदऽ रुपयऽ बगा
धा वरसांची घरांत आली माजी अन् अस्तुरी
लागलूं करावया चाकरी !

[ २ ]

कोंम्बडसादीं उठूनश्यानी धन्याकडऽ जाउन
असावंऽ सारा दिस राबुन
करजफ्येड बिगिबिगी कराया क्येला खाडाबि न
कदीबी नाय पायला सन
बापुस होता तंवर कसाबी चालत होतंऽ घर
फुडऽ मग सारंच उलटंऽ फिरं !
आम्बील प्येज बी घरांत नाई मिल
चिरगुटां फाटलीं, मन माजं ऽ हळहळ !
मिनि धन्या साङ्गलंऽ तों झालंऽ आगळं
भलतंऽ काई धनी बोलला तवां वाटलंऽ मनीं
नरडिचा घ्वाटच घ्यावा झनी !

[ ३ ]

दीस चाललऽ कसऽ बसऽ तरि, बाइल खपतऽ भली
गुनांची खान मना लाभली
फुडंऽ जलमलीं मुलांबिलांबी ओढ वाढली तशी
खातसऽ शरम सारखी मशी !
द्येव उगवतां भ्याच वाटतंऽ त्वाण्ड दावन्या नग
बुडावंऽ द्येवासङ्गऽ जग !
घरधनिन राबुनी जिवापाड धडपड
पोटांत घांघ नाय् ! पोरांची तडफड
काळीज उडतसे बगुनी ह्यें धडधड !
गुनी समदि हीं. माज्यापायीं दुख त्येनी भोगनं
नगऽ ह्यें मेलेल्याचं जिनं !

---

## : ४९ : कुण्डींतला गुला

उगवले निसर्गतां हिमनगीं इतस्ततां
उधळतात रम्यता बहरुनी गुलाब ते.
अतरङ्ग आरुणी प्रीतिरङ्ग दावुनी
जणु अनङ्ग रङ्गणीं हांसुनी उभा असे!
मूर्तिमन्त चारुता ही अनन्त निर्मिता
तीच हन्त! रम्यता मानवां विमोहवी
आस हौस शान्तवी मन्दिरांस शोभवी
क्रूर रीत मानवी बंधनीं पडे तरू!
अदय–हृदय मानव द्रव न ज्यास ये लव
आपल्या सुखास्तव नीच मार्ग आचरी
आपल्या हिताकडे लक्ष एक तेवढें
तरू मरोत बापुडे खुरडुनी सुकोत ते!
भूषवावया मुलें काढतो सदा फुलें
तरूकडे न पाहिलें कीं जिवन्त वा मृत!
अति निकृष्ट सम्प्रतीं होतसे परिस्थिती
स्वतन्त्रतेस मागती जन्मसिद्ध आपुल्या!
“ सर्व शत्रु वारुनी अन्न नीर अर्पुनी
स्थान हें दिलें कुणी? मीच बण्ड हें उगा!”
बोलतो असें धनी! तरी जनीं निघे ध्वनी
‘स्वार्थहेतुसाधनीं कोण्डिले तरू वृथा!’

———

: ५० :

## बन्दीवान

करी याचना कळवळून यांना
तरी या जनां कळवळा जरा ना !
मुदें आळवी सहज गोड ताना
जगा हांसवी रवि जसा विताना
न शङ्का मनीं विधि न दे इषारा
पडे बन्धनीं विहग हा बिचारा !
वनीं पाखरे विहरतीं मजेनें
तरू मोहरें बहरती प्रसूनें
रमावें तसें गमत नील व्योमीं
भरारूं कसें ? फडफडें वृथा मी
हृदींच्या कळा चिवचिवून दावी
फुटूनी गळा हृदय सुन्न होई !

—×—

: ५१ :

## शुभम गल

तपन उदयगिरिवरती दिसत आरुणी
बघत सकल मुकुल कळ्या स्तिमित होउनी !
प्राची-रवि-परिणय तिथ थाटला असे
अनुरागें रङ्गतसे म्हणुन दिनमणी !
अन्तःपट दाट धुकें वधुवरांमधें
दंवकण, छे अक्षताच उधळल्या कुणीं !
दूर तिमिरपट करुनी हळुच पाहते
लाल गाल होत तिचे लाजलाजुनी !
शुभमङ्गल सावधान गरजती द्विज
अन्तःपट सरत, उभय बघत हांसुनी
लग्न सरे उडुबाला परतल्या घरीं
दशदिशा प्रसन्न ! दिव्य घुमतसे ध्वनी !

———

: ५२ :

# माझी दिवाळी

पसवलं भात आले तुरे भरघोस
फुलल्याती लोंबी मस्त पसरला वास
दंव पडे देवदया पाझरते जशी
दान्यामधीं दूध भरे, जीव व्हई खुषी!

घामाला कीं फळ माज्या धान्याचं या आलं
उरऽ णार चार दानऽ मऽ न आसावलं !
कर्जापोटीं द्याया भात औन्दा मिलनार
वरी नाचणीचं पीक भुकेला आधार

राखायला हवा शेत सावजापासून
माळ्यावर जागतसे गोफण घेऊन
सोबतीला माज्यासङ्गऽ हांसनाऱ्या तारा
आभाळांत चाले त्यांचा जागता पहारा

रात निजे काळोखाचं घेऊन काम्बळ
सप्न तिला ग्वाड पडे चान्दन्या आभाळ !
तान्यासऽङ्गे वाकळींत असऽल अस्तुरी
नामी सप्नऽबगत ती असंच हांसरी !
दिवाळीची आरासबी माज्या लई छान
आभाळांत लावल्या या दिवल्या देवानं !
डोळ्यावर नीज, तरी डबा वाजवीत
हाकारा मी देत गातों उन्च आवाजींत !

---

तूं हांसशी चैत्रासवें
आतां कशाला आंसवें
क्रान्तीविना ना उन्नती, लक्षांत ठेवी हें पुरें !
जाते घडी जेव्हां जुनी
सन्धी जगा लाभे झणीं
वर्षामुळें फेसाळती जे कोरडे ग्रीष्मीं झरे
गङ्जून जाई जें जुनें
नाविन्य दे सञ्जीवनें
सोनें जुनें तें मानुनी सृष्टी पुढें कैशी सरे ?
" सृष्टी प्रवाहीं वाहते
वैशिष्ट्य कैसें राहतें ? "
शङ्का कुशङ्कांनीं तुझीं व्याकूळतातीं अन्तरें
लोण्ढा विरोधायास्तव
हा मार्ग नाहीं वास्तव
कांहीं मुठींनीं वाळुच्या कां ओघ एका आवरे ?
चैतन्य अङ्गीं सञ्चरो
वारें नवें अङ्गीं भरो
दुःखें त्यजी सारीं तरो येवो धुमारे हांसरे !

---

तूं हांसशी चैत्रासवें
आतां कशाला आंसवें
क्रान्तीविना ना उन्नती, लक्षांत ठेवी हें पुरें !
जाते घडी जेव्हां जुनी
सन्धी जगा लाभे क्षणीं
वर्षामुळें फेसाळती जे कोरडे ग्रीष्मीं झरे
गङ्जून जाई जें जुनें
नाविन्य दे सञ्जीवनें
सोनें जुनें तें मानुनी सृष्टी पुढें कैशी सरे ?
" सृष्टी प्रवाहीं वाहते
वैशिष्ट्य कैसें राहतें ? "
शङ्का कुशङ्कांनीं तुझीं व्याकूळतातीं अन्तरें
लोण्ढा विरोधायास्तव
हा मार्ग नाहीं वास्तव
कांहीं मुठींनीं वाळुच्या कां ओघ एका आवरे ?
चैतन्य अङ्गीं सञ्चरो
वारें नवें अङ्गीं भरो
दुःखें त्यजी सारीं तरो येवो धुमारे हांसरे !

---

## : ५४ : तरङ्ग

शेतकीचा देश माझा, त्यांतला मी राबणारा
राबुनीही राहणारा अर्धपोटी काळ सारा
सावकारांना भराया मी पसारा माण्डणारा
मोजणारा कामगारां वाढणारा शेतसारा !

अन्न द्याया भार झाला हांसरा संसार, दारा
बाग जो आनन्ददायी जीवनाभावीं सहारा—
पारखा झालों ऋणानें मी घरादारा बिचारा
माळवाऱ्यानें पुसाव्या या भुक्यांच्या अश्रुधारा !

जागृती आली किसानां हो प्रभावी ऐक्यमन्त्र
या बघूं राहील कैसें भारताचें पारतन्त्र्य ?
लुप्त होतो जैं हिवाळा सृष्टि हांसे कालमानें
काकरूपा टाकुनीया कोकिला गातील गानें !

राष्ट्रदेवी वाजवीतां गोड वीणा याच ठाईं
भारताच्या थोरवीची थोर वीची साथ देई !

———

# : ५५ : निसर्गनीति

वृक्षांनीं स्वशिरीं जरी मिरविलें सारीं प्रसूनें तरी
"येतां कां ?" अनिलें हळूच वदतां घेती उड्या सत्वरीं !
स्वेच्छेनें विपिनीं स्वयंवर करी आम्रासवें वल्लरी
भोतालीं विहरे धुमारुन कधीं अन्यासही स्वीकरी
प्रेमें गाढ रमून भृङ्ग कमलीं जो घालवी शर्वरी
त्याला मातित मित्र अन्य सुमनें जीं साजिरीं गोजिरीं
शैला निर्झरिणी नभें जरि दिली, सोडी गिरीला झरी
जाते हांसत दूर जीवन मुदें, सिञ्चीत देशान्तरीं
ह्या दृश्यांत दिसे सनातन न कां पावित्र्य उद्धारक ?
वाटे उन्नतिचा निसर्ग—नय हा बन्धो न आल्हादक ?
कल्याणप्रद अन् हितावह असे तो धर्म मानी निका
नीतीचीं बुजगावणीं बघुन कां शङ्का कुशङ्का फुका ?
रूढी कोन्दट, गुद्मरून जनता निःश्वास टाकी पहा
मैत्रीचा मनमोकळ्या मिळवुनी घे प्राणवायूच हा !

———

## : ५६ : निसर्गाचा प्रभाव

स्वातन्त्र्यमृगजलें मना फसविलें दडपुन हृद्भावना ! ध्रु.
वायुच्या मृदुकरें जलीं
सरसरे तरङ्गावली !
गुदगुल्या नि रोमावली
प्रीतिच्या सुखकर संवेदना !
सळसळां पल्लवीं ध्वनी
खळखळा करी वाहिनी
गूजितांतली मोहिनी
सान्धिते उभयांच्या जीवना !
अणुअणूंमधें चारुता
पाहुनी मती अवनता
लीन मी रूपगर्विता
विसरुनी सारा मानीपणा !
एकटेंच गमतें जिणें
सहचराविना जग सुनें
धुग्धुगे हृदय नी म्हणे
" हवा या जोडिदार जीवना "
लोटलें दूर एकदां
टोचतें शल्य तें हृदा
अर्पिते हृदय सम्पदा
स्वीकरी, विसर जुनें मोहना !

———

: ५७ :

# गवळी

नयनां मुरडून बघे लतिका
पवनें उमले हंसुनी कलिका
झुळझूळ झरे नद मन्दगती
करि आतप—वारण पर्णतती !
मधु कूजन चालतसे विटपीं
मकरन्द अलीगण गुङ्गत पी
जणुं इन्द्रमहालच भव्य गमे
हरि कुञ्जवनीं असल्याच रमे.
नर श्याम कुणी घुमवी पवरी
वदनीं खुलतीं सुमनें हंसरीं
बसण्या मृदु आसन हें हिरवें
मिळणें नशिबांतच खास हवें
मृदुशील हळू घुमवी गवळी
जमलींच गुरें सगळीं जवळीं !

———

येतसे मजकडे झेप सदा घालुनी
कधिं 'ये ये' करूनहि मात्र बसे मुरकुनी
मी जशी कुणि तरी अनोळखी पाहुणी
        उमलते कळी जैं आन्जारुन गोन्जरूं !

नुमजुनी तयाच्या हातुन भलतें घडे
'मी रागवलें कां ?' हळुच बघे मजकडे
मग गोड हंसे मृदु अधोमुखी छबकडें
        रविपुढिल धुक्यासम राग पळे भुरुभुरू

कधिं तयास मी जर उदासीन दिसतसे
खेळुनी हांसुनी सुखवाया झटतसे
जणुं पापा घ्याया गाल पुढें करितसे
        किलबिलें बागडे भवतीं कीं पांखरूं !

किति भावि काळच्या रम्य येत कल्पना
होणार सानुलें थोर भरंवसा मना
मज जिजाइचेंही भाग्य गमे दूर ना
        नव रङ्ग मनोहर आशा लागे भरूं !

———

येतसे मजकडे झेप सदा घालुनी
कधिं 'ये ये' करूनहि मात्र बसे मुरकुनी
मी जशी कुणि तरी अनोळखी पाहुणी
उमलते कळी जैं आन्जारुन गोन्जरूं !

नुमजुनी तयाच्या हातुन भलतें घडे
'मी रागवलें कां ?' हळुच बघे मजकडे
मग गोड हंसे मृदु अधोमुखी छबकडें
रविपुढिल धुक्यासम राग पळे भुरुभुरू

कधिं तयास मी जर उदासीन दिसतसे
खेळुनी हांसुनी सुखवाया झटतसे
जणुं पापा द्याया गाल पुढें करितसे
किलबिलें बागडे भवतीं कीं पांखरूं !

किति भावि काळच्या रम्य येत कल्पना
होणार सानुलें थोर भरंवसा मना
मज जिजाइचेंही भाग्य गमे दूर ना
नव रङ्ग मनोहर आशा लागे भरूं !

———

## : ५९ : बोलाचें मोल

कां रुसलिस तूं साजणऽ
　　मगापुन सबदबि नाय् बोलणऽ ध्रु०
लइ ग्वाड तुजंऽ भासन
मैनाबि पळऽ सरमुन
ऐकुनी हरपतो शिण
　　भुलवितो किरीष्न कीं मुरलिनं
पाहशी कशीशी मशी
डोळ्यांनीं खाशी जशी
तुजि कशी बिगडली खुषी
　　पिरतिला व्होट जनू लागुन !

तुज वस्त कायबी हई
तरि बिगीबिगी ऐकवी
पुरवीन हौस ती नई
        गाळुनी घाम रगत आट्वुन
पन हांस बोल मोकळी
गालांत खुलू दे खळीं
तुजि हंसुंदे मिटली कळी
        मक्याचंऽ कणिस मुखीं उघडुन
अगटिच्या मुळंऽ भावलंऽ
चमकुनी इजेगत जळऽ
पिरतिचंऽ निशानच भलंऽ
        मला जाय् चटका तें लावुन
लइ पिरत तुज्यावर असऽ
तुजि मुरत मनामदि बसऽ
ऐन्यांत मानुसच जसंऽ
        पर कसंऽ बिगडुन गेलंऽ मन ?
"उरमाल पगा पेटला"
"पिरतिचा सबद लाबला
फसवलंऽ युकतिनंऽ तुला"
"काय तरि इस् बा हे वागनं !"

———

## : ९० : जागेपणींचें स्व

उल्हास आनन्द सारा सभोतीं, कळ्यांना उषा हांसवूं लागली
प्राची दिशा नाथ—चण्डांशु येई म्हणूनी नभीं लाजुनी रङ्गली
निस्तेज झाले थवे तारकांचे, सरीं जागृती येत पद्मांप्रती
आमोद कोन्दाटला कोनकोनीं, सुगन्धी सुमें मोद निःश्वासती!
प्राजक्त शाळूवरी भर्जरीच्या फुलांची खडी काढणें सम्पवी
व्योमीं उडूनी रवीला स्तवीती कवी सुस्वरें गात गाणीं नवीं
वायूसवें सूर आलाप येती, गमे दिव्य गाणें अनन्तांतलें
नादांत त्या गुङ्गलों रङ्गलों अन् मुखीं गीत कांहीं घुमूं लागलें
होतों समाधींत, तों गोड कानीं ध्वनी नूपुरांचा पडूं लागला
वीणाहि झङ्कारतां ऐकली, ये मयूरासवें सारजा मगङ्ला
मातेस माझ्या नमस्कार केला मनीं लाजलों काय माझे स्वर
"वाटे समाधान गा" अश्रणीसा पडे शब्द गम्भीर कानांवर
झङ्झानिलें तीव्र अन्तःप्रवाहें उफाळून आकर्षणें अन्तर
वीची सदा येत, या मोजक्यांच्या खुणा ज्या पुढें येत 'वेळेवर'!

## ६१ : नाविन्यास-

तव सहाय्य नसतां प्रसव कसा नव अभिनव कवनाला ?
चैत्र हंसवी किसलयानें
वन उपवनें माळरानें
ही नवी नवाई सजवी कोकिल–हृदया गानाला
अरुणरंगि नटविलेली
ये उषा जैं हंसत गालीं
तैं मुकुल कमल मधु परिमळ सोडी उधळित हास्याला
गगन भरलें तारकांनीं
उदधि तरि ना गात गाणीं
परि नव्या कलांचा शशी उगवतां हांसत तो आला
मुकुल कलिका नव विकसतां
द्विजगणीं चैतन्य दिसतां
श्रणिं सहस्त्रकिरणां प्रसवे रवि जणुं कविताचरणांला !
नित नवनव्या भावनांनीं
नटवुनीया गोड गाणीं
मी तुजविण कैसा रसिकवरांच्या हलवूं हृदयाला ?

: ६२ :

## मृत्यूस

स्वातन्त्र्यरणीं झुझत येतां अजि कामा
होईन हुतात्मा !
तूं शक्त न द्यायास कुणा पूर्ण विरामा
कां घोळ रिकामा ?

घे अग्निपरीक्षा अथवा लाव कसाला
हानी न यशाला
फाकेल दुणें तेजच ! हा काय मुलामा ?
कां घोळ रिकामा ?

चिन्ता नच लागे जरि हालाहाल घ्यावें
कर्तव्यच ठावें
स्वातन्त्र्य उषा ये क्षितिजीं सम्पुन यामा
कां घोळ रिकामा ?

कार्यें अपुरीं बेत मनीं राहुन जाती
हुर्हूर मना ती
स्वातन्त्र्य मरूनीहि ! भला लाभ गुलामा !
कां घोळ रिकामा ?

माझा 'अहिंसा' शोणितबिन्दूहि उठेल !
ज्वाला भडकेल !
स्फूर्तिप्रद मन्मृत्यु जना दे नव जोमा
कां घोळ रिकामा ?

मृत्युञ्जय होतो नर कार्यीं रत झाला
काळें कर काळा !
निष्ठा मम ध्येयीं, 'शिव' येणें परिणामा !
कां घोळ रिकामा ?

होतां पिकलें पान यमा तूं मग येची
तूं माय दयेची !
तूझीच जिवां सोबत जातां निजधामा
कां घोळ रिकामा ?

———

: ६३ :

## विज्ञापना

पारख मुक्ताहार, सहृदया, पारख मुक्ताहार.
कमलदलस्थित जलकण दिसतिल
मुक्ताफलसम चार !
कृषिवल निटिलांवरिल गुंफला
घर्म मौक्तिकाकार
दलित लोचनांतुन गळणारे
नीर–बिन्दु दिसणार
परवशतेची आच जीवना
बुद्‌बुदती हुङ्कार !
विसरण्या कळा फुलें जमविलीं
त्यांतिल मधुसम्भार
यांत मधुन मम सुखस्मृतींची
चमकदार जरतार
रत्नाकर जरि अथाङ्ग त्यांतहि
मोल यास मिळणार
पहा हवा तर राम मारुते !
यांतुन पतिताधार !



# वाङ्मयाची भूषणें



| | | |
|---|---|---|
| गलोल–(विनोदी लेखसंग्रह) | किं. | १॥ रु. |
| विद्युत्प्रकाश–(कथासंग्रह) | ,, | १ रु. |
| वाङ्मयविलास–(टीकासंग्रह) | ,, | १॥ रु. |
| साहित्य आणि संसार–(लेखसंग्रह) | ,, | १॥ रु. |
| प्रतिभा-साधन–(२री आवृत्ति) | ,, | २ रु. |
| काश्मिरी गुलाब–(कादंबरी) | ,, | २ रु. |
| बुद्धिबलक्रीडारत्नें– | ,, | २। रु. |
| मानस-मंदीर–(मानसशास्त्रीय) | ,, | १। रु. |
| दत्तक व इतर गोष्टी–(कथासंग्रह) | ,, | १२ आणे |
| दिव्यचक्षु–(कादंबरी) | ,, | २ रु. |
| वनभोजन–(टीकासंग्रह) | ,, | १ रु. |
| जडावाची देवी–(एकांकी नाटिका) | ,, | ६ आणे |
| तोतया नाटककार–(विनोदी नाटक) | ,, | १२ आणे |
| क्षमेसाठीं अपराध–(एकांकी नाटिका) | ,, | ४ आणे |
| प्रवासांतील सोबती–(कादंबरी) | ,, | २। रु. |
| अभ्रपटल–(कादंबरी) | ,, | २। रु. |
| कागदी होड्या–(लघुनिबंधसंग्रह) | ,, | १२ आणे |
| खेळणीं–(बालकथासंग्रह) | ,, | ३ आणे |

**स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.**

